# ग्रंथमाला



मासिकपुस्तकांत छापलेलें प्रकरण.



# अशोक

## अथवा

## आर्यावर्तांतला पहिला चक्रवर्ती राजा

## याचें चरित्र.

वासुदेव गोविंद आपटे, बी. ए.
नेटिव्ह प्रेस रिपोर्टरचे फर्स्ट असिस्टंट
यांनीं

प्राचीन शिलालेख, पाली भाषेंतले बौद्धग्रंथ आणि इंग्रजी
व बंगाली भाषेंतले ग्रंथ यांच्या साहाय्यानें लिहिलें.

तें
कोल्हापूर :— 'श्रीसमर्थप्रसाद' छा० छा०.

१८९९.

किंमत ऽ१२, ट० हां० ऽ१.

# अर्पणपत्रिका.

परम सन्माननीय आणि पूज्य मित्र

## कै० वामन दाजी ओक

अमूल्य महाराष्ट्रकाव्योदधि 'काव्यसंग्रहा'चे संपादक,
यांच्या अमर आत्म्यास,

त्यांची विद्वत्ता, अत्यंत शोधक बुद्धि, मराठी भाषेचें मार्मिक
ज्ञान, काव्यग्रंथांच्या उद्धारार्थ अविरत श्रम, लेखनकौशल्य,
तरुणांस प्रोत्साहन देऊन त्यांच्या कृतीचा गौरव
करण्याचें त्यांचें वर्णनीय चातुर्य इ० अनेक
गुणांस लुब्ध होऊन आणि विशेषत: मज-
वरच्या त्यांच्या अखंड प्रेमाच्या
अभिनंदनार्थ
परम पूज्यबुद्धीनें
ही अल्प कृति
अर्पण करीत आहे.

चरित्रलेखक.

# प्रस्तावना.

( मूळ इंग्रजीवरून मराठींत भाषांतर ).

भारतवर्षांतील पुण्यश्लोक नृपतींच्या मालिकेंत मेरूप्रमाणें शोभणाऱ्या अशोक राजाच्या चरित्रास ही प्रस्तावना लिहिण्यांत एवढाच उद्देश आहे कीं, भूतदयेनें अंतःकरण द्रवून ज्यानें बौद्ध धर्माची दीक्षा घेतली व त्या धर्माचा प्रतिपालक बनून तत्प्रसारार्थ नानाप्रकारें श्रम केले, अशा त्या नृपश्रेष्ठाच्या आंगच्या विविध गुणांचा परिचय करून घेण्याची लालसा उदारधी महाराष्ट्र वाचकांमध्यें उत्पन्न करावी. अशोक हा मूळचा ब्राह्मणधर्मी होता. परंतु पुढें निग्रोध नामक तरुण शामनेश ( बौद्धगुरू ) ची सत्वशील वृत्ति पाहून त्याची बौद्धधर्माकडे प्रवृत्ति झाली. निग्रोधानें त्याला बौद्धधर्माचा उपदेश केला; आणि सत्य आणि पावित्र्य यांच्या शोधास लागण्याकडे त्याच्या मनाची प्रवृत्ति केली. अशोकानें जे आदेश पुढील पिढ्यासाठीं ह्मणून ठेविले आहेत, त्यांत जगद्गुरू ( बुद्ध ) च्या उपदेशाचीं तत्वें थोडक्यांत आणिलीं आहेत. अशा प्रकारचे लेख मिसर, ग्रीस, रोम, बाबिलोन, असीरिया, आरबस्थान, इराण, चीन, पालिस्टैन, यांपैकीं एकाही देशांत आढळत नाहींत. आजपर्यंत अशोक असा एकच होऊन गेला. आणि आर्यावर्तांत होऊन गेलेल्या सर्व थोर नृपतींत तो अग्रगण्य होता. बुद्ध, धर्म आणि संघ या तीन गोष्टींवर त्याची निष्ठा किती दृढ होती, हें त्यानें आपला प्रियपुत्र महिंद आणि कन्या संघमित्रा यांना धर्मप्रचारक ह्मणून सीलोन बेटांत पाठविलें, या एका गोष्टीवरून चांगलें व्यक्त होतें. महिंद व संघमित्रा यांनीं प्राचीन ताम्रपर्णी येथें जाऊन भूतदयाविशिष्ट बौद्ध महाधर्माची स्थापना केली आणि इक्ष्वाकुवंशोद्भव

शाक्य गोतम ज्या पवित्र बोधिवृक्षाखालीं बसून २४८८ वर्षांपूर्वी श्रेष्ठ बुद्ध पदवीला पोहोंचला, त्या वृक्षाची एक शाखा इतिहासप्रसिद्ध अशा अनुराधापुरनामक नगरींत त्यांनीं नेऊन लाविली.

बौद्धधर्म कित्येक शतकेंपर्यंत हिंदुस्थानांत राहिला आणि हिंदुस्थानाच्या बाहेरही त्याचा प्रसार इतका दूरवर झाला होता कीं, पूर्वेकडे आरबस्थानाच्या सीमेपासून तो पश्चिमेकडे जपानच्या हद्दीपर्यंत सर्वत्र ‘ परमप्रेमा ’च्या मताच्या मंजुळ ध्वनि ऐकूं येत होता. परंतु इतक्यांत लांब आरबस्थानच्या किनाऱ्यापाशीं वादळ झालें आणि प्रतिमाभंजक इस्लामी धर्माच्या भयंकर वावटळींत बौद्धधर्मीयांचे प्रशस्त विहार आणि साधुसंतांचें ग्रंथभांडार यांचा चुराडा झाला; व खोतान, काश्गारिया, खोरासान, मध्यएशिया, गांधार, काश्मीर आणि हिंदुस्थानापासून जावाबेटापर्यंतचा प्रदेश येवढ्या टापूंतला बौद्धधर्म नष्ट झाला. दहाव्या शतकापासून तों सोळाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत मुसलमानांच्या हातून बौद्ध ग्रंथांचा सारखा नाश होत होता. ( टॉडकृत राजस्थान पहा ). उत्तर हिंदुस्थानांत शैवधर्मी मिहिरकुल आणि शशांक यांचे सारख्या राजांनीं राजकारणास्तव बौद्धधर्माचा नाश करण्याचें व्रत आरंभिलें. परंतु त्यांच्या नंतरच्या कित्येक राजांनीं त्याला पुन्हा आश्रय दिला. चौदाव्या शतकांत सुधन्वन् ह्मणून कोणी राजा दक्षिणेंत होऊन गेला. तो हिंसानिषेध करणाऱ्यास देहांतशासन करीत असे, असें कळतें. परंतु जैनधर्मीयाविषयींची ही गोष्ट असावी, बौद्धाविषयीं नव्हे, असें दिसतें.

आर्यधर्माचीं तत्वें त्यांच्या अत्यंत शुद्ध स्थितींत लोकांना उपदेशून त्याचा प्रसार सर्व एशियाखंडभर करण्याचें व परदेशीयांना देखील त्याच्या छत्राखालीं आणून सोडण्याचें श्रेय एकट्या बौद्धधर्मानें संपादिलें. सेमिटिक धर्माच्या अमंगळ संसर्गाचा विटाळ होऊं न देतां अत्यंत शुद्ध स्थितींत राहिलेला बौद्धधर्म पाहणें असेल, तर तो आज जपानांत पाहण्यास सांपडेल.

इंग्रजी अमलाखालीं हिंदुस्थानांत सर्वत्र शिक्षणाचा प्रसार झाला आहे. प्राचीन विद्येचें पुनरुज्जीवन होत आहे; सहिष्णुता आणि धर्मस्वातंत्र्य हींही आज दिसत आहेत. राष्ट्राच्या अभिवृद्धीचींही ( खरीं खात्रीलायक ) चिन्हें आहेत. तेव्हां अशा काळीं एखाद्या धर्माची निंदा करण्याचे अगोदर त्याची माहिती कोणी करून देत असला तर त्याचें ह्मणणें ऐकून घ्यावें. सृष्ट चमत्कारांचें पृथक्करण आणि त्याच्या कारणांचा शोध हीं शास्त्रीय ज्ञानाचीं प्रधान अंगें होत हें सांगावयास नको.

बौद्धधर्म हा आर्यावर्तातला धर्म, आर्यावर्तातल्या लोकांना इंक्ष्वाकुवंशोद्भव एक श्रेष्ठ आर्यानेंच मूळ उपदेशिला आहे, आणि **श्री** वासुदेव गोविंद आपटे यांचें प्रस्तुत **अशोक** चरित्राचें पुस्तक त्या धर्माविषयींची महाराष्ट्रीयांची स्मृति पुनः एकदां जागृत करील अशी मीं खात्री बाळगतों.

महाबोधी सभा.
मद्रास १३ आक्टोबर
बौद्ध संवत्सर २४४३.

**अंगारिक एच्. धर्मपाल.**

# ग्रंथकर्त्याची प्रस्तावना.

तळघरांत मोहरांचे हांडे भरलेले असावेत, परंतु त्यांवर बसलेल्या कृष्णसर्पाच्या भीतीनें त्यांचे जवळ जाण्याससुद्धां कोणाची छाति होऊं नये, आणि अशा स्थितींत आमच्या पूर्वजांनीं आमचेसाठीं खूप द्रव्य संचय करून ठेविला आहे, ह्मणून कोरड्या गप्पा मारूनच स्वतःच्या मनाचें समाधान करून घेण्याचा प्रसंग यावा, तशी तूर्त आपल्या लोकांची स्थिति झाली आहे. भारतवर्षीय ऐतिहासिक भांडार कांहीं सामान्य नाहीं; परंतु त्यावर कालरूपी कृष्णसर्प आपल्या प्रचंड देहाचें आवरण घालून बसल्यामुळें, आणि त्याला तेथून हुसकावून लावण्यास ज्ञान, उद्योग, आणि खरा अभिमान या तीन अवश्य लागणाऱ्या साधनांचा आमचे ठायीं अभाव असल्यामुळें, परकीय मांत्रिकांची कांस धरल्यावांचून आमचें धन आह्मांस लाभेनासें झालें आहे. आमच्या एतद्देशीय लोकांतच असे महामांत्रिक उत्पन्न होतील, तो सुदिन ह्मटला पाहिजे.

असो. प्रस्तुत चरित्राचा विषय ह्मणजे हिंदुस्थानच्या इतिहासांतला मूळचा एक अत्यंत उज्वल तथापि कालगतीनें विस्मृतींत पडून राहिलेला भाग आहे. सर विल्यम् हंटर साहेबांनीं हिंदुस्थानच्या राज्यकर्त्यांची मालिका काढण्याचा विचार केला, तेव्हांच त्या मालिकेंतलें दुसरें पुष्प 'अशोक' हें प्रो० ऱ्हिस डेव्हिड्स यांचे हातून गुंफवून तें इंग्रजी वाचकांस अर्पण करणार होते, आणि तो योग जुळून आला असता, तर माझे श्रम वांचून हल्लींच्यापेक्षां अनंतपटीनें उत्कृष्ट चरित्रग्रंथ भाषांतर रूपानें कां होईना, पण मराठी वाचकांचे हातीं पडला असता. पण दुर्दैवानें हंटर साहेबांस कांहीं कारणामुळें तो विचार रहित करावा लागला,

आणि त्यामुळें अशोकाच्या चरित्राची इंग्रजी व मराठी ग्रंथभांडारांत जी वाण होती, ती पुरी होण्याचा योग अद्यापपर्यंत आला नाहीं.

अशोकाचें साद्यंत चरित्र इंग्रजी भाषेंत जरी अद्याप झालें नाहीं, तरी बंगाली साहित्यांतली ती उणीव बाबू कृष्ण विहारीसेन यांच्या परिश्रमानें पूर्ण झाली आहे. तथापि सेनप्रणीत अशोक चरित्रांत एक मोठी गोम मला ही आढळली कीं, त्यांनीं अशोकासंबंधानें ठिकठिकाणीं जीं विधानें केलीं आहेत, त्यांना खरोखर आधार किती आहे किंवा तीं केवळ तर्कसिद्ध आहेत याचें स्पष्टीकरण कोठेंही केलेलें नाहीं. त्यामुळें त्या पुस्तकावरही मला अवलंबून राहतां येईना. अखेर सर्व माहिती स्वतः गोळा करण्याचा निश्चय करून, त्या दिशेनें आज दोन तीन वर्षें केलेल्या परिश्रमाचें हें फळ महाराष्ट्र वाचकांस अत्यादरानें अर्पण करण्यांत मला फार संतोष वाटत आहे.

प्रस्तुत चरित्रास मुख्य आधारभूत ग्रंथ ह्मटले ह्मणजे, पाली भाषेंतले महावंश आणि अशोक अवदान हे ग्रंथ, इंग्रजींतले मि० दत्त, डा० राजेंद्रलाल मित्र, मि० बील, जनरल कनिंगह्याम्, मि० सेनर्ट, मि० पॉल कॅरसव, प्रो. ऱ्हिस डेव्हिड्स यांचे ग्रंथ व बंगालींतले सेनप्रणीत अशोक चरित्र आणि 'साहित्य' मासिक पुस्तकांतले 'मौर्यसम्राट् अशोक' शीर्षक निबंधचतुष्टय हे होत. याशिवाय इतर किरकोळ ग्रंथांचेही पुष्कळ साहाय्य झालें आहे. ह्या सर्व ग्रंथकारांचा व सदरहू ग्रंथ मिळवून देण्याचें कामीं ज्यांनीं मनःपूर्वक साहाय्य केलें अशा मित्रांचा मी अत्यंत आभारी आहें. या संबंधांत माझे मित्र रा. रा. गंगाधर रामचंद्र मोगरे आणि रा० रा० आनंदराव सोहिरोबा तेलंग यांचे उपकार मी कधीं विसणार नाहीं.

हें पुस्तक ग्रंथमालेच्या एका अंकांत देण्यासाठीं मुद्दाम लिहिल्यामुळें, ८० पृष्ठांत सगळ्या माहितीचा समावेश करावा लागला, व त्याप्रमाणें तें लिहून तयारही झालें, पण पुढें आकस्मिक रीतीनें लेखकाचा अतिशय

उत्साहभंग झाल्यामुळें, त्याच्या पुढची व्यवस्था त्याला काळजीपूर्वक करतां आली नाहीं, याबद्दल दिलगिरी वाटते. तथापि एवढें येथें सांगणें अवश्य आहे कीं, ग्रंथमालेचे संपादक प्रो० वि. गो. विजापूरकर एम्. ए., या विद्वान् गृहस्थांनीं प्रोत्साहन दिलें नसतें, तर हा लेख आज माझ्या दप्तरांतच पडून राहिला असता. एवढी प्रस्तावना या लहानशा पुस्तकास पुरी आहे.

मुंबई. ता० २४
आक्टोबर १८९९.

वा० गो० आपटे.

# चक्रवर्ती राजा अशोक याचें चरित्र.

## प्रकरण पहिलें.

### अशोकाची योग्यता.

" झाले बहु. होतिल बहु; परंतु यासम हा "—मयूरकवि.

अशोकाची योग्यता.

भरतखंडांतील ज्या कीर्तिमान् राजांचीं नांवें इतिहासांत चिरस्मरणीय होऊन राहिलीं आहेत, त्या सर्वांत बौद्धधर्मप्रचारक चक्रवर्ती राजा अशोक याचें नांव अग्रगण्य आहे. द्वापार युगांत युधिष्ठिर आणि कलियुगांत विक्रमादित्य, हर्षवर्धन ( शालिवाहन ) आणि अकबर येवढेच कायते सार्वभौम राजे, ह्याच्याशीं तुलना करण्यास योग्य होऊन गेले. यांपैकीं युधिष्ठिरा विषयीं पौराणिक कथांपलीकडे दुसरी कांहीं ऐतिहासिक माहिती उपलब्ध नसल्यामुळें, ते वगळून बाकीच्या राजांशीं अशोकाची तुलना करूं लागलों, तर अशोक त्यांच्यापेक्षां अनेक पटीनें श्रेष्ठ होता हें कबूल करावें [1] लागेल. अशोकाचा पराक्रम अवर्णनीय होता, आणि त्याच्या राज्याचा विस्तारही फार मोठा होता. पूर्वेकडे वंग ( बंगाल ) आणि कामरूप ( आसाम ); दक्षिणेकडे गोदावरीचें तीर; पश्चिमेकडे सौराष्ट्र ( काठेवाड ) आणि सिंधुतट व उत्तरेकडे काश्मीर आणि हिमालयपर्वत अशा त्याच्या राज्यम-

राज्यविस्तार.

---

1 " No greater prince had ever reigned in India since the Aryans first colonised this country and no succeeding monarch excelled his glory ( R. C. Dutt's History of Civilization in ancient India ) vol ii P. 2.

र्यादा होत्या.[2] येवढ्या प्रांतांत तर त्याचें पूर्ण स्वामित्व होतें. परंतु त्यांच्याही पलीकडे जीं **चोल, पांड्य, योन, कांबोज, गांधार,** पितिनिक, **आंध्र,** वज्रि, **भोज,** पुलिंद, **ताम्रपर्णी** वगैरे राज्यें होतीं, तींसुद्धां त्याच्याशीं मांडलिकत्वाच्या नात्यानें राहत होतीं.[3] ह्मणजे हिंदुस्थानचा जवळ जवळ तीनचतुर्थांश भाग त्याचे ताब्यांत होता. येवढा मुलूख त्याचे पूर्वीं दुसऱ्या कोणत्याही राजानें पादाक्रांत केलेला नव्हता. याच कारणासाठीं अशोकाला हिंदुस्थानचा पहिला चक्रवर्ती राजा ह्मणतात. परंतु अशोकाचें नांव इतिहासांत सुवर्णांकित होऊन राहिलें आहे तें त्याच्या पराक्रमासाठीं किंवा राज्यविस्तारासाठीं नव्हे, तर अज्ञानांत गढून गेल्यामुळें, धर्माच्या खऱ्या तत्त्वास विसरून गेलेल्या आपल्या प्रजेस एका नवीन पण शुद्ध धर्ममार्गास लावून तद्द्वारा तिची उन्नति करण्यासाठीं त्यानें केलेले परिश्रम, त्याची स्वत:ची सत्यनिष्ठा, आणि धर्मश्रद्धा, अनेक धर्मकृत्यें आणि त्यानें स्वत: घालून दिलेलें स्वार्थत्यागाचें उत्कृष्ट उदाहरण, या व अशा इतर सोज्वल कृत्यांमुळें त्याचा कीर्तिनाद आज दोन हजार वर्षें त्रिखंडांत दुमदुमून राहिला आहे.[4] एका जर्मन ग्रंथकारानें ह्मटलें आहे[5]—" एखाद्याचें नांव त्याच्या पश्चात् जितक्या ज्यास्त लोकांस ज्यास्त कालपर्यंत वंद्य होऊन राहील, तितकी त्याची योग्यता थोर समजावी. हें जर खरें असेल तर शार्लमेन व सीझर या पाश्चात्य प्राचीन इतिहासप्रसिद्ध नृपतींपेक्षां अशोक फार श्रेष्ठ होता, हें कबूल करावें लागेल ". सारांश, भरतखंडाच्या इतिहा-

**अशोकाच्या कीर्तीचें रहस्य.**

---

2 Dr. Rajendral Lal Mitra's Indo-Aryans vol. ii P. 407; Indian Antiquary vol. xx P. 249 ( M. E. Senart's paper on the Inscriptions of Piyodasi ).

३ शिलालेख [ आदेश ] २, ३ व १३ पहा.

4 R. c. Dutt's History of civilization in Ancient India vol. ii. p. 2.

5 Coppen Die Religiondes Buddha.

सरूपी नभोमंडलांत अशोक राजा सूर्याप्रमाणें प्रकाशत होता. परंतु आमच्या लोकांच्या दृष्टीवर अज्ञानाचें पटल आल्यामुळें, आणि पौराणिक दंतकथेचें धुकें ऐतिहासिक वातावरणांत दाट पडल्यामुळें, त्या सूर्याची प्रभा आणि प्रखरता, त्याचे गुण व दोष सगळेच सारखे आह्मांस दिसेनातसे झाले आहेत. अशोकाविषयीं आतां कोणी माहिती मिळविण्याचा प्रयत्न करील तर त्यास बौद्धधर्मीय पौराणिक ग्रंथ, व परदेशीय प्रवाशांनीं व ग्रंथकारांनीं लिहून ठेवलेल्या सत्यासत्यमिश्रित गोष्टी, यापलीकडे खरोखर विश्वसनीय अशी माहिती क्वचित्च मिळेल. नाहीं ह्मणावयाला खुद्द अशोकानें कांहीं शिलालेख कोरून ठेविलेले अद्यापि कायम आहेत, तेवढे मात्र पुढील इतिहासलेखकांच्या चांगले उपयोगीं पडतील. येवढ्या चक्रवर्ती राजाच्या कारकीर्दीचासुद्धां विश्वसनीय इतिहास उपलब्ध नसावा, ही गोष्ट इतिहासदृष्ट्या अत्यंत शोचनीय आहे, पण याचें कारण कोणाच्याही सहज लक्षांत येणारें आहे. डा० राजेंद्रलाल मित्र ह्मणतात कीं, अशोकानें आपल्या वंशपरंपरागत धर्माचा त्याग केल्यामुळें, त्याच्याविषयीं तिरस्कार उत्पन्न होऊन कोणी हिंदु इतिहासकारानें त्याचें वृत्त लिहून ठेविलें नाहीं, आणि बौद्ध ग्रंथकारांनीं त्याचा साग्र वृत्तांत कदाचित् लिहून ठेविलाही असेल, परंतु त्या धर्माला हिंदुस्थानाबाहेर घालविण्यांत, तेव्हांच्या धामधुमींत ते ग्रंथ नष्ट झाले असतील. माझ्या मतें हें कारण सयुक्तिक दिसत नाहीं. कारण धर्मांतर न केलेल्या विक्रमादित्य, शालिवाहन इ० हिंदू राजांविषयीं तरी पुरेशी माहिती कोठें उपलब्ध आहे? तेव्हां धर्मांतरापेक्षां अन्य कांहीं कारण असलें पाहिजें हें उघड आहे. आणि तें कारण ह्मणजे आमच्या लोकांची इतिहासाविषयीं पूर्वापार चालत आलेली अनास्था होय, असें ह्मणणें भाग पडतें. परकीय ग्रंथकारांच्यादेखील लक्षांत आमच्यांतला हा दोष आलेला

**ऐतिहासिक माहितीचा अभाव.**

**आमच्या लोकांची अनास्था.**

6 Indo-Aryans vol. ii.

आहे असें दिसतें. सीलोनचे बिशप् व बौद्धधर्मावर ग्रंथ लिहिणारे प्रसिद्ध कोपल्स्टन् साहेब लिहितात :—" The genius of Indian nations seems to have been at all times averse to history."

---

# प्रकरण दुसरें.

## तत्कालीन भरतखंडाची स्थिति.

धर्म आणि समाज.

ख्रि० श० पूर्वी ६ व्या शतकांत भरतखंडांत एक प्रचंड धर्मक्रांति करून सोडणारा पुरुष होऊन गेला. त्याचें नांव शाक्य गोतम. यासच पुढें बुद्ध ह्मणूं लागले. त्याच्या हयातींत त्यानें आपल्या धर्माचा प्रसार हिंदुस्थानांत चोहोंकडे केला होता; परंतु त्या धर्माचीं मुळें अद्यापि लोकांच्या अंतःकरणप्रदेशांत खोल जाऊन बळकट झालीं नव्हतीं. इतक्यांत बुद्ध मरण पावला. त्याच्यामागें त्याच्या शिष्यांनीं आपल्या गुरूचें व्रत कांहीं दिवस बऱ्याच जोरानें चालविलें होतें; परंतु माळेंतला मेरू गळून पडला ह्मणजे इतर मणि जसे विस्कळित होतात, त्याप्रमाणें बौद्धांच्या संघशक्तीचा मुख्य मेरू गोतम हा जातांच, बाकीचे मणी अस्ताव्यस्त होऊन पडल्याकारणानें, त्यांच्यातला जोर कमी झाला होता व मतभेद आणि परस्परविरोध यांचें प्राबल्य होऊन, भिन्न भिन्न संप्रदाय आणि पंथ निर्माण होऊं लागले होते. इकडे हिंदू समाजांतल्या लोकांच्या आचारविचारांत दिवसेंदिवस विलक्षण अंतर पडत चाललें होतें. धर्मशास्त्र आणि रूढि यांच्यातलें द्वंद्व आतांच्या सारखें तेव्हांही सुरू होतें. धर्मांत असावयाचें एक, आचरणांत दिसावयाचें दुसरें, आणि तोंडानें प्रतिपादावयाचें तिसरेंच, असा हल्लींच्या काळीं दिसणारा प्रकार तेव्हांही होता. क्षत्रियकुलाचा प्रायः लोप होऊन त्यांची जागा शूद्रांनीं पटकाविली होती. नंदराजा शूद्र होता. मौर्यवंशांतले सगळे राजे शूद्रच होते. ज्याप्रमाणें क्षत्रियकुलाचा लोप झाला होता, त्याप्रमाणें अस्सल ब्राह्मणकुलालाही बौद्धधर्माचा भुंगा लागल्यामुळें त्यांच्यांतलें खरें

ब्राह्मण्य नष्ट होत चाललें होतें. धर्मशास्त्रांच्या पठनाचा क्रम मागें मागें पडत जाऊन दर्शनादि शास्त्राकडे लोकांची प्रवृत्ति ज्यास्त ज्यास्त होत चालली होती. त्यामुळें एकीकडे न्यायशास्त्राच्या पद्धतीनें विचार करण्याचें शिक्षण व दुसरीकडे सांख्यासारख्या निरीश्वरवादाचा प्रसार, या दोहोंच्या मध्यें ब्राह्मणसमाज यावेळीं सांपडला होता. एकीकडे पतंजलिकृत योगशास्त्रांत सांगितलेले अनेक अनैसर्गिक व्यापार, तर दुसरीकडे त्यांना धिःकारून मनाची शांति, क्षमा, दया इ० गुणांची महति गाणाऱ्या बुद्धधर्माचा उपदेश. या दोन परस्पर विरोधीशक्तींच्या कचाट्यांत सांपडल्यामुळें ब्राह्मणांची स्थिति याकाळीं अत्यंत शोचनीय झाली होती. इकडे अलेक्झांडर वगैरे ग्रीक राजांनीं भरतखंडावर स्वाऱ्या करून उच्छाद मांडला होता. आणि या स्वाऱ्यांचा परिणाम समाजावर अकल्पित रीतीनें होत होता. या परदेशीय लोकांशीं वारंवार राज्यकारण पडल्यामुळें भरतखंडांतील हिंदू राजांचें त्यांच्याशीं एकप्रकारचें संघट्टन झालें होतें, व तें दिवसेंदिवस इतकें वाढत गेलें कीं, परस्परामध्यें बेटीव्यवहारसुद्धां होऊं लागला होता, असें कित्येकांचें ह्मणणें आहे. मगध देशाचा राजा चंद्रगुप्त (अशोकाचा आजा) यानें ग्रीक राजाच्या मुलीशीं विवाह केला होता, ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे. राजाचें हें उदाहरण पाहून त्याचें अनुकरण त्याच्या सरदारांनींही केलें असल्यास नवल नाहीं. सारांश, ग्रीक व हिंदू या दोन रक्तांचा मिलाफ होण्यास या काळीं थोडीबहुत सुरवात झाली होती. पुढच्या काळांतला इतिहास उपलब्ध नसल्यामुळें, पुढें ही चाल तशीच चालू राहिली किंवा मागें पडली तें कळत नाहीं. पण ख्रि० श० पूर्वीच्या तिसऱ्या चौथ्या शतकांत वर वर्णिल्यासारखी सामान्यतः धार्मिक व सामाजिक स्थिति होती, यांत संशय नाहीं. तत्कालीन लोकांच्या आचारविचारांत एकप्रकारची ढवळाढवळ चालली होती. याप्रमाणें अशोकानें आपल्या कारकीर्दींत पुढें जी प्रचंडक्रांति अकल्पित रीतीनें घडवून आणली, तिची तयारी त्याच्या आजाच्या [ चंद्रगुप्ताच्या ] कारकीर्दीपासून किंबहुना त्याच्याही अगोदरपासून चालली होती, असें यावरून दिसतें.

शास्त्रें आणि कला.

जे लोक जात्याच बुद्धिमान् आणि पाणीदार असतात, ते दुसऱ्याच्या संगतीपासून कांहीं तरी फायदा करून घेतल्याशिवाय राहत नाहींत. ख्रि० श०पूर्वी तिसऱ्या चौथ्या शतकांत ग्रीक लोकांच्या इकडे वरचेवर स्वाऱ्या होऊं लागल्यापासून, त्यांचें व हिंदूंचें विशेष संघट्टन होऊं लागलें ह्मणून वर सांगितलेंच आहे. आणि ग्रीक लोक या काळीं सुधारणेंत अग्रगण्य होते. अर्थात्च ते हिंदुस्थानांत आले तेव्हां हिंदूंनीं त्यांच्यापासून भौतिक शास्त्रें व कला यांविषयींचें जेवढें ज्ञान मिळवितां आलें, तेवढें मिळविण्यास कमी केलें नाहीं. याचा अर्थ कित्येकांनीं असा केला आहे कीं हिंदूंना हा कालपावेतों शास्त्रकलाज्ञान बिलकुल नव्हतें, आणि त्यांनीं ग्रीक लोकांपासूनच प्रथम त्या ज्ञानाचा ओनामा घेतला. खोदींव शिल्पकाम आणि लिहिण्याची कला हींदेखील ग्रीक लोकांनींच प्रथम हिंदुस्थानांत आणिलीं, असेंही कित्येक इतिहासकर्त्यांनीं ह्मटलें आहे. पण त्याला बिलकुल आधार दिसत नाहीं. हिंदूंना पूर्वीपासून या विद्या अवगत होत्या; ग्रीक लोकांचें उदाहरण पाहून त्यांनीं त्यांत फक्त सुधारणा केली येवढी गोष्ट खरी आहे या काळचें शिल्पकाम पाहून डा० फर्ग्युसन नामक एका शिल्पकलाविचक्षण पंडितानें पुढील उद्गार काढले आहेत—" ख्रि० श० पूर्वीच्या तिसऱ्या शतकांतलें बुद्धगया किंवा भारहट येथील शिल्पकाम अस्सल हिंदूंचें आहे. त्यांत परकीयांच्या पद्धतीची भेसळ दिसत नाहीं. त्या ठिकाणीं हत्ती, हरिण, वानर इत्यादिकांचीं चित्रें कोरण्यांत जी कुशलता दिसून येत आहे, तशी कुशलता जगांत दुसरीकडे कोठेंही आढळून येत नाहीं. त्याचप्रमाणें झाडें आणि वेलपत्ती वगैरे बारीक नक्षीच्या कामांत दिसून येणारा नाजूकपणाही प्रशंसनीय आहे. "[८]

---

७ यासंबंधानें सविस्तर विवेचन R. C. Dutt's History of Civilization in Ancient-India व Dr. Rajendra Lal Mitra's Indo-Aryans या ग्रंथांत आहे, तें जिज्ञासूंनीं पहावें.

8 R. C. Dutt's History of Civilization vol. ii P. 64.

या काळीं लोकांमध्यें प्रचलित भाषा कोणती होती तें कळण्यास आज कांहीं साधन उरलें नाहीं. परंतु ज्या अर्थी सर्व लोकांस कळावें ह्मणून अशोकानें आपले शिलालेख पाली भाषेंत कोरून ठेविले होते, त्या अर्थी पाली हीच त्या काळीं उत्तर हिंदुस्थानांतली प्रचलित भाषा असावीसें दिसतें. अशोकाच्या लेखांच्या भाषेंतही देशपरत्वें थोडाबहुत फरक आढळतो. त्यावरून जनरल कनिंगह्याम नांवाच्या पंडितानें असें निश्चित केलें आहे कीं, पाली भाषेच्याच पंजाबी, उज्जनी, आणि मागधी अशा तीन शाखा होत्या. पंजाबी पालींत ' र ' हें अक्षर असून त्याचा स्पष्ट उच्चार होत असे; जसें—प्रियदर्शी, श्रामण इ०. तसेंच श, ष, स या तीन अक्षरांमधील भेदही पाळण्यांत येत होता. उज्जनी पालींत ' र ' आणि ' ल ' हीं दोन्हीं अक्षरें असत, आणि ' ष ' या अक्षराचाही कधीं कधीं उपयोग करीत असत ( उ०—पाषंड ). परंतु मागधी पाली भाषेंत र हें अक्षरच नसे. त्याच्या ठिकाणीं नेहमीं ' ल ' लिहिण्याचा प्रघात होता. राजा—लाजा ; अंतरम्—अंतलम्; दशरथ—दशलथ इ०. या तिन्ही पालीभाषेच्या शाखा होत्या. विलसन व लासन साहेबांचेंही असेंच मत आहे. प्रिन्सेप साहेब ह्मणतात कीं, ही अशोकाच्या लेखांची भाषा संस्कृत व पाली यांच्या मधली कांहीं निराळी भाषा असली पाहिजे. परंतु विद्वानांचें बहुमत ती पाली असावी असें आहे. अशोकाच्या वेळची लिपिही गमतीची असे. ही लिपि दोन प्रकारची होती. एक आरबी किंवा फारशी भाषेप्रमाणें उजवीकडून डावीकडे लिहीत जाण्याची; आणि दुसरी मराठी, इंग्रजी वगैरे भाषांप्रमाणें डावीकडून उजवीकडे लिहीत जाण्याची. यांपैकीं पहिलीचा मासला कपूर्दगिरी येथील लेखांत पाहण्यास सांपडतो. या लिपीला आरिआनोपाली ( Ariano-pali ) असें इंग्रजी पंडितांनीं नांव दिलें आहे. दुसरी अशोकाच्या इतर लेखांत दृष्टीस पडते. तिला इंडोपाली ( Indo-Pali ) असें

ह्मणतात. यांपैकीं पहिली परकीयांपासून घेतलेली व दुसरी हिंदुस्थानची आहे असें ह्मणतात. देवनागरी या दुसरीपासूनच निघाली असें ह्मणतात.

---

# प्रकरण ३ रें

## कुलवृत्तांत.

**मौर्यवंश.**

मगध देश फार प्राचीन काळापासून इतिहासप्रसिद्ध आहे. कौरव-पांडवांचे वेळीं जरासंध ह्मणून एक महापराक्रमी राजा होऊन गेला. त्यानें शेकडो राज्यें पादाक्रांत करून, तेथच्या राजांस बंदिवान करून आणिलें होतें. शेवटीं श्रीकृष्णानें पांडवांसह ब्राह्मणांचे वेष घेऊन व त्याचे यज्ञशाळेंत जाऊन, भीमाकडून त्याला मल्लयुद्धांत मारविलें ही कथा सुप्रसिद्धच आहे. जरासंधाचा पुत्र सहदेव. हा सहदेव कुरुक्षेत्रांत झालेल्या प्रचंड भारतीयुद्धांत कौरवांच्या पक्षानें लढत होता. सहदेवानंतर आणखी २१ पुरुषांनीं राज्य केल्यावर मगध देशाचें राज्य प्रद्योतवंशांतील पुरुषाकडे गेलें. यानंतर झालेल्या पुरुषांचीं नांवें विष्णुपुराणांत येणेंप्रमाणें आढळतात—१ शिशुनाग; २ काकवर्ण; ३ क्षेमधर्मन्; ४ क्षत्रौज; ५ बिंबिसार ६; अजातशत्रु; ७ दर्भक; ८ उदयीश; ९ नंदवर्धन; १० महानंदी व ११ सुमाल्य; सुमाल्यास आणखी ८ भाऊ होते. ते क्रमाक्रमानें गादीवर बसले. नंदवंशांतल्या शेवटल्या राजाचे वेळीं चंद्रगुप्त ( याला ग्रीकभाषेंत सांद्रकोटस असें ह्मणतात ), यानें मगधावर स्वारी करून तें राज्य हस्तगत केलें. आपल्या पौराणिक ग्रंथांत चंद्रगुप्त हा एक दासीपुत्र होता असें लिहिलें आहे. त्यानें प्रसिद्ध मुत्सद्दी जो चाणक्य त्याला वश करून घेऊन, त्याच्या साहाय्यानें नंदकुलाचा नाश करून मगध देशाची गादी बळकांविली. बौद्ध दंतकथा अशी आहे कीं,

---

९ देवनागरी वगैरे लिपींची मूळ उत्पत्ति कशी झाली याविषयीं जनरल कनिंगह्याम यांनीं आपल्या Corpus Inscriptionum Indicarum vol. i या बहुमोल ग्रंथांत उत्कृष्ट व विद्वत्त्वपूर्ण विवेचन केलें आहे तें जिज्ञासूंनीं पाहावें.

१० विशाखदत्तकृत मुद्राराक्षस नाटक पहा.

चंद्रगुप्त हा मोरिय नगरच्या राणीचा पुत्र होता, त्यावरून त्याच्या कुळाला मौर्यवंश असें नांव पडलें. कांहीं असो चंद्रगुप्त हा पराक्रमी राजा होता येवढें खास. त्याच्या दरबारीं ग्रीकराजाचा वकील मेगास्थनीस हा असे व ग्रीक राजा सेल्युकस यानें आपली मुलगीही चंद्रगुप्ताला दिली होती. ख्रिस्तिशकापूर्वी २९१ या वर्षाच्या सुमारास चंद्रगुप्त मरण पावल्यानंतर त्याच्या गादीवर त्याचा पुत्र बिंदुसार हा बसला. ग्रीक लोक त्याला अमित्रकेटिस (Amitra Chates=(संस्कृत) अमित्रकेतु अथवा शत्रुविनाशक) असें ह्मणत. या बिंदुसाराला दोन मुलगे होते. थोरल्याचें नांव सुशीमा आणि धाकट्याचें अशोक अथवा अशोकवर्धन. अशोक हाच आपला चरित्रनायक होय[१२].

**अशोकाची जन्मकथा.**

अशोकाच्या जन्माविषयींची एक कथा अशी आहे. अशोकाचा बाप बिंदुसार राजा राज्य करीत असतां चंपापुरी नामक नगरींत एक दरिद्री ब्राह्मण वास करीत होता. त्याला सुभद्रांगी नांवाची एक सुस्वरूप कन्या होती. ती उपवर झाली, तेव्हां तिच्याकरितां वर शोधण्याच्या विवंचनेंत तो ब्राह्मण असतां, एक ज्योतिषी त्याचे घरीं सहज आला व त्यानें तिची पत्रिका पाहून सांगितलें कीं, या मुलीचे पोटीं कोणी मोठा चक्रवर्ति राजा जन्मास यावा असे हिचे ग्रह आहेत. हें ऐकून या भविष्याचा ठोकताळा पाहण्यासाठीं तो ब्राह्मण मुलीला घेऊन राजमंदिरीं गेला आणि नजराणा ह्मणून मुलीला राजाचे पुढें त्यानें उभी केली.

---

11 Beal's Si-yu-ki.

१२ अशोकाच्या चरित्रासंबंधाचे तीन हस्तलेख १ अवदानशतक; २ दिव्य अवदान; आणि ३ अशोक अवदान असे सांपडतात. यापैकीं अशोक अवदान यांत १००० अनुष्टुप् श्लोक असून तो विशेष महत्वाचा गणिला जातो. या ग्रंथांत आरंभींच अशोकाची वंशावळी येणेंप्रमाणें दिली आहे.—१ बिंबिसार [ हा शाक्य गौतमबुद्ध याचा समकालीन होता ]; १ महीपाल; ३ उदयीश; ४ मंड ५ काकवर्णी; ६ सहली; ७ तरकरी; ८ महामंडळ: ९ प्रसेनजित्; १० नंद; ११ बिंदुसार; आणि १२ अशोक. दिव्य अवदानांत दिलेलीं नांवें यांहून बरींच भिन्न आहेत.

त्या ब्राह्मणकन्येचें लावण्य पाहून राजा मोहित झाला आणि त्यानें तिच्याशीं विवाह करून तिला अंतःपुरांत ठेविलें. तिच्यावर राजाची प्रीति जडली हें अंतःपुरांतल्या इतर राण्यांना दुःसह झालें. त्यांनीं तिचा मत्सर करावा, हलकींसलकीं कामें तिच्याकडून करवावीं आणि होतांहोईल तों राजाची व तिची दृष्टादृष्ट न होईल, व ती राजाचे मर्जींतून उतरेल अशी तजवीज ठेवावी. अशा रीतीनें बराच काळ गेल्यावर राजाला तिचा अगदीं विसर पडला. तेव्हां त्या ब्राह्मणकन्येला फार दुःख झालें. तिनें राजाची भेट घेऊन मर्जी सुप्रसन्न करून घेण्यासाठीं दररोज सकाळीं राजाचा श्मश्रू करून त्याचे केंस विंचरण्याचें काम पतकरलें. तें काम एकनिष्ठपणें बजावल्यावरून एकेदिवशीं राजा तिच्यावर सुप्रसन्न झाला, आणि 'तुला काय बक्षीस पाहिजे तें माग' ह्मणून ह्मणाला; तेव्हां ती नम्रपणें ह्मणाली 'महाराज, आह्मीं स्त्रिया पट्टराणीच्या पदापेक्षां आणखी मोठें बक्षीस तें काय मागणार? महाराजांची मर्जी असली तर तेवढें या दासीला द्यावें' तेव्हां राजा ह्मणाला— 'हें कसें होईल? आह्मीं पडलों क्षत्रिय आणि तूं तर दासी ह्मणजे शूद्रकन्या.' यावर ब्राह्मणकन्येनें इत्थंभूत कथा सांगितली. तेव्हां इतर राण्यांचा नीच, मत्सरी स्वभाव व हिचा थोरपणा त्याच्या लक्षांत येऊन, राजानें तिला पट्टराणी करून तिची व्यवस्था निराळी करून दिली. त्या उभयतांची प्रीति कालक्रमानें वाढत गेली, आणि या प्रीतिवृक्षाचें पहिलें मधुर फळ अशोक नामें पुत्ररत्न हें झालें. मुलाचें नांव अशोक असें ठेवण्याचें कारण, त्याच्या प्रसवाचे काळीं मातेला यत्किंचितूही शोक अथवा कष्ट झाले नाहींत. अशोकाच्या मागून तिला आणखी एक पुत्र झाला. त्याचेंही नांव त्याच कारणावरून वीताशोक असें ठेविलें.[१३]

---

१३ मि॰ हॉग्सन यांनीं नेपाळांतून बौद्धधर्मासंबंधीं जे अनेक हस्तलेख आणिले, त्यांत तीन ग्रंथ होते. बंगालचीं रॉयल एशिआटिक सोसायटी, ग्रेटब्रिटनची रॉ॰ ए॰ सो॰ आणि पारीस येथील ए॰ सो॰. या तिन्ही संस्थांना प्रत्येकीं एकेक याप्रमाणें ते तिन्ही ग्रंथ त्यांनीं देऊन टाकिले. पैकीं पारीसच्या वाट्याला 'अशोकअवदान' ह्मणून जो ग्रंथ आला, त्यांत ही दंतकथा लिहिली आहे. डा॰ राजेंद्रलाल मित्र यांचा Nepalese Buddhist Literature नामक ग्रंथ. पृष्ठ ८ पहा.

# प्रकरण ४.

## अशोकाचें पूर्ववय.

'ऊंस दिसती वाकुडे । परी अंतरीं रसाळ '—मुकुंदराज.

**पूर्व स्वभाव.** अशोक कुरूप होता, आणि त्यामुळें बापाची त्याच्यावर फारशी प्रीति नसे. तशांत त्याचें वर्तन पहिल्यापासूनच अतिशय द्वाड आणि उद्धटपणाचें असे. कोणाला नाहीं कोणाला तरी छळल्यावांचून आणि रडविल्यावांचून त्याचा दिवस जात नसे. आणि ह्मणून सगळे लोक त्याचा तिरस्कार करीत; तथापि हा कोणत्या काळीं काय करील याचा नेम नसल्यामुळें त्याला सर्व लोक वचकून असत. त्याच्या निष्ठुर स्वभावावरून त्याला ' चंड ' असें टोपण नांव मिळालें होतें. शरीराची व स्वभावाची अशी दोन्ही प्रकारची अंतर्बाह्य कुरूपता असतांही तो पुढें ' देवानां प्रिय ' या *पदवीस पात्र झाला, हा मोठा चमत्कार आहे. या चमत्काराचा उलगडा पुढें होईल.

**तक्षशिला येथील बंड.** राजा बिंदुसार याचें अशोकावर फारसें प्रेम नव्हतें हें वर सांगितलेंच आहे. अशोकाचें बालवय संपून त्याला समजूं लागलें तरी त्याच्या स्वच्छंदी आणि निष्ठुर स्वभावांत काडीमात्र अंतर पडलें नाहीं, हें पाहून तर त्याला विशेषच राग आला, आणि कांहीं तरी निमित्त काढून ही ब्याद एकदाची घराबाहेर घालवावी, मग पुढें मुलाचें कांहींही होवो, अशा विचारांत तो होता. इतक्यांत ( इ. स. पू. २८० वर्षें ) तक्षशिला ( पंजाब ) नामक दूरच्या प्रांतांत बंड झाल्याचें वर्तमान आलें. तेव्हां तें बंड मोडण्याच्या कामावर अशोकाची रवानगी झाली. **अशोक** तेथें जाऊन पोचतांच लोक नजरनजराणे घेऊन त्याच्या भेटीस आले. आणि त्यांनीं तेथील सुभेदाराच्या जुलमाला आह्मीं कंटाळलों आहों, येव-

---

*' देवानां प्रिय ' ही शिवीहि आहे. अर्थ ' पशुवत् मूढ. ' " तेऽप्यतातपर्यज्ञा देवानां प्रिया: "—काव्यप्रकाश—संपादक

ढेंच काय ते, परंतु राज्याचे विरुद्ध आह्मी त्रिलकुल नाहीं, अशी त्याची खात्री केली; तेव्हां अशोकानें मोठ्या थाटानें शहरांत प्रवेश केला. नंतर लवकरच खासास लोकांचा मुलूख ( काश्मीर ) त्यानें काबीज केला. तक्षशिलाचें बंड मोडल्यानंतर लवकरच त्याची बदली उज्जनी येथील सुभेदारीच्या कामावर करण्यांत आली. तिकडे जाण्यास तो निघाला असतां, वाटेंत चैत्यगिरी ( विसनगर ) येथें त्याचा मुक्काम पडला. तेथें एका धनिक व्यापाऱ्याच्या सुस्वरूप तरुण मुलीची व त्याची दृष्टादृष्ट झाली. त्यावरून तिला त्यानें आपली राणी केली (इ० स० पू० २४७). तिला एक मुलगा महेंद्र व मुलगी संगमित्रा अशीं दोन अपत्यें झालीं. ह्या दोघांनींही सिंहलद्वीपांत धर्म प्रसार करून आपलें नांव तिकडे अजरामर करून ठेविलें वगैरे वृत्त पुढें येईल.

इकडे अशोक उज्जनीस गेल्यानंतर तक्षशिला येथील लोकांनीं पुन: बंड केलें. तें मोडण्यासाठीं राजानें आपला वडील मुलगा सुसीमा यास पाठविलें. सुसीमा तक्षशिला प्रांतीं गेला असतां, मागें राजा बिंदुसार मरणोन्मुख झाला. तेव्हां आपल्या मागें गादी कोणास द्यावी ह्याचा विचार त्यास येऊन पडला. अशोक कुरूपतेमुळें आणि स्वच्छंदी स्वभावामुळें राजाच्या मर्जीतून उतरलेला होता, आणि सुसीमावरही कांहीं कारणामुळें मर्जी सुप्रसन्न नव्हती. तेव्हां राजानें प्रधानाची मसलत विचारली. सुसीमानें एकदां प्रधानाचा अपमान केला होता, त्याचा सूड घेण्यास ही चांगली संधि आहे असें पाहून प्रधानानें अशोकास गादी देण्याविषयीं राजाचें मन वळविलें. तेव्हां राजानें त्याच्या शब्दास मान देऊन असें ठरविलें कीं, तूर्त अशोकानें कारभार पहावा व पुढें सुसीमा तक्षशिला येथील बंड मोडून परत आला ह्मणजे राज्यपद त्याचे हवालीं करावें.

**बिंदुसाराचा मृत्यु व**

याप्रमाणें व्यवस्था केल्यावर बिंदुसार मरण पावला ( ख्रि०श०पू० २६३ वर्षें ). परंतु बिंदुसराच्यामागें ही व्यवस्था फार दिवस टिकली

**अशोकास राज्यप्राप्ति नाहीं.** अशोकानें स्वत:च गादी बळकाविली.[14]

अशोकास राज्यप्राप्ति झाल्यादिवसापासून चार वर्षांनीं त्याला राज्याभिषेक झाला. या अभिषेक कालासंबंधानें पंडितांचा फार मतभेद आहे. मि० व्हिस डेव्हिड्स् साहेबांच्या मताप्रमाणें हा काल ख्रि०श०पू० २६७ वर्षें, पालीग्रंथाप्रमाणें २७२ वर्षें, प्रो० मोक्षमूलर यांच्या मताप्रमाणें २६६ किंवा २६३ वर्षें, बाबू मनमोहन चक्रवर्ती यांच्या मतें २७१ वर्षें व मि० सेनार्ट यांच्या मतें २६९ किंवा २७० वर्षें आहे.

बापाच्या मृत्यूचें वर्तमान ऐकतांच सुसीमा पाटलीपुत्रास येण्यास निघाला. परंतु अशोकानें गादी बळकाविल्याचें वर्तमान त्याला वाटेंतच दूतांकडून कळलें. तेव्हां निराशा आणि संताप यांच्यायोगानें त्याचें डोकें फिरलें आणि त्यानें ' स्वपर बळाबळ ' न पाहतां एकदम पाटलीपुत्रावर स्वारी करण्याचा निश्चय केला, आणि थोडेंसें सैन्य जमवून मजल दरमजल कूच करीत तो त्या राजधानीवर चालून गेला. अशोक स्वत: पराक्रमी असून, त्याच्या बापाचें सैन्य मोठें होतें, शिवाय त्याला राधागुप्तासारख्या चतुर प्रधानाचें पूर्ण साहाय्य होतें. यामुळें सुसीमाचा पराभव करण्यास अशोकाला कांहींच आयास पडले नाहींत. सुसीमानें किंवा दुसऱ्या कोणी वारसानें पुन: वर तोंड करूं नये ह्मणून ' नृपोद्यानांतले सगळे वृक्ष मुळासुद्धां उपटून टाक ' अशी सांकेतिक आज्ञा

---

14 Cunningham's Bhilsa Topes या ग्रंथात हीच गोष्ट अमळ निराळ्या तऱ्हेनें सांगितली आहे. ती अशी:— आपला अंतकाळ जवळ आला असें जेव्हां बिंदुसुराला दिसून आलें, तेव्हां त्यानें सुसीमाला परत बोलाविण्याविषयीं प्रधानाला सांगितलें. परंतु प्रधानानें लबाडी करून त्याला न बोलवितां अशोकाला बोलावून आणिलें. त्याप्रमाणें अशोक तातडीनें येऊन दाखल झाला. अशोकाला पाहतांच राजाच्या अंगचा इतका संताप झाला कीं, त्या संतापामुळें त्याच्या शरीरांतील एक धमनी आपोआप फुटून बराच रक्तस्राव झाला, व त्यामुळें ग्लानि येऊन बिंदुसार तत्काळ मरण पावला.

अशोकानें आपल्या एका सरदारास केली. परंतु हें घोर कृत्य करण्यास त्याचा हात धजेना, तेव्हां स्वतःच हातांत तलवार घेऊन त्यानें राजवंशांतल्या सगळ्या पुरुषांची मुलाबाळासुद्धां कत्तल केली आणि आतां निर्वेधपणें राज्य करण्यास हरकत नाहीं, असें समाधान मानून, तो विलासी स्त्रियांसह क्रीडा करण्यासाठीं क्रीडोद्यानांत गेला, अशी हकीकत कित्येक ग्रंथांत लिहिली आहे.[१५]

अशोकाच्या क्रूरपणाविषयीं दुसऱ्याही पुष्कळ गोष्टी सांगतात. कोणी-ह्मणतात कीं, क्षमा हा गुण पूर्व वयांत त्याला अगदीं अपरिचित होता. कोणी कितीही क्षुल्लक अपराध केला तरी त्याला देहांत शिक्षा मिळावयाची. यामुळें अपराध करून राज्याच्या तावडींत सांपडणें ह्मणजे प्रत्यक्ष मृत्यूच्या दाढेंत जाण्यासारखें आहे, असें प्रत्येकांस वाटे. प्रत्यक्ष अशोकाच्या प्रीतींतल्या राण्याही त्याच्या रागाच्या तडाक्यांतून जीवंतपणें कधीं सुटल्या नाहींत. अंतःपुरांतल्या स्त्रिया एकेदिवशीं आपआपसांत मन मोकळें करून बोलत असतां, बोलण्याच्या ओघांत कोठें दोन शब्द राजाच्या कुरूपतेबद्दल सहज बोलून गेल्या. ती गोष्ट त्याचे कांनीं जातांच इंगळासारखे लाल डोळे करून, त्यानें त्या सगळ्यांना आपल्या समोर फरा फरा ओढून आणिलें आणि त्यांना अग्निकुंडांत जिवंत जाळ-

---

१५ Nepalese Buddhist Literature P. 9. सिंहलद्वीपांतल्या लेखांत आपल्या ९९ भावांना ठार मारून अशोकानें गादी बळकाविली, फक्त एक भाऊ तिष्य यति झाल्यामुळें त्याच्यावर तेवढें शस्त्र चालविलें नाहीं, असें ह्मटलें आहे. मि० तारानाथ यांच्या मतें त्यानें फक्त ६ भाऊ मारले, परंतु या सगळ्या गोष्टी अगदीं खोट्या असाव्यात. कारण खुद्द अशोकाच्या लेखांत [ धौली आणि जौगड येथील शिलालेख ] आपले भाऊ व बहिणी जिवंत असल्याविषयीं उल्लेख केलेला आढळतो. व्हीलर साहेबांच्या हिंदुस्थानच्या इतिहासांत लिहिलें आहे कीं, सुसीम याला मारलें, तेव्हां त्याची बायको गरोदर होती. तिनें पळून जाऊन एका चांडाळाचा आश्रय केला, व तेथेंच ती प्रसूत झाली. तिचा मुलगा पुढें भिक्षु झाला, व त्यानें आपल्या चुलत्याचे अपराध विसरून जाऊन त्याला बौद्ध धर्माची दीक्षा दिली. महावंशातही याच गोष्टीचा उल्लेख आढळतो.

ण्याविषयीं चंडगिरीक नांवाच्या आपल्या दुष्ट चाकरास आज्ञा केली. त्यानें स्वामीची आज्ञा अक्षरशः पाळिली हें सांगावयास नकोच[16].

अशा क्रूरपणाच्या कृत्यांमुळें लोक त्याला चळाचळा कांपूं लागले.

**नरकस्थापना**

त्याचे मांडलिकसुद्धां त्याच्याशीं फार भिऊन वागत. यामुळें त्याला आपल्या सत्तेचा इतका गर्व झाला कीं, तो देवाशीं आपली बरोबरी करूं लागला. आपलें ऐश्वर्य, आपला अधिकार, आपलें सामर्थ्य सर्व कांहीं इंद्राच्या ऐश्वर्याहून, अधिकाराहून व सामर्थ्याहून उणें नाहीं व आपली राजधानी पाटलीपुत्र नगरी ही तर प्रत्यक्ष इंद्रपुरीच असें त्यास वाटूं लागलें. परंतु देवाच्या राज्यांत दुष्कृत्य करणाऱ्या पाप्यांना दंडस्थान ह्मणून नरक ही जशी स्वतंत्र योजना आहे, तशी योजना आपल्या राज्यांत नाहीं येवढाच कायतो देवांत आणि आपल्यांत भेद आहे असें वाटून तोही भेद काढून टाकावा ह्मणून एका घोर नरकाची स्थापना करण्याविषयी त्यानें हुकूम सोडिला[17]. एका विस्तीर्ण मैदानाच्या सभोवार मजबूत तटबंदी करून त्याच्या आंत घोर यातनेचीं सर्व साधनें ह्मणजे शस्त्रे चक्रें, तप्त तेलाच्या कढया, लोहशूल इ० वस्तूंचा तेथें संग्रह करून ठेविला. प्रथम ज्यांनीं अपराध केला असेल, त्यांनाच या ठिकाणीं पाठवून शिक्षा देण्यांत येत असे; परंतु पुढें पुढें जो कोणी येईल त्याला उचलावें आणि त्या नरकांत ढकलून मारावें असा क्रम सुरू झाला[18].

---

१६ अशोक अवदानांत हीच गोष्ट किंचित् भिन्न रीतीनें सांगितली आहे. राजाच्या कुरूपतेसंबंधीं चर्चा केल्यामुळें नव्हे, तर राजोद्यानांतल्या अशोकवृक्षाच्या फांद्या तोडल्याबद्दल, त्यांना हें देहांत प्रायश्चित मिळालें असें त्या ग्रंथांत ह्मटलें आहे.

१७ अशोक उज्जनी येथें सुभेदार असतां, तेथेंही त्यानें असाच एक नरक स्थापन केला होता असें Cunningham's Bhilsa Topes यांत ह्मटलें आहे. पृ०९६.

१८ Beal's Si—Yu-Ki P. 46. दुसऱ्या एका ग्रंथांत ( Legge's translation of Fa-Hien's travels P. 91 ) असें लिहिलेलें आढळतें कीं, या नरकस्थानाचा बाह्य भाग उद्यान, कारंजी, स्वच्छ निर्झरोदकाच्या पुष्करणी, लतामंडप इत्यादिकांनीं इतका मनोहर करून सोडला होता कीं, सहज एखाद्यास त्या ठिकाणीं क्षणभर जाऊन बसण्याची बुद्धि व्हावी. आणि तेथें जाण्यास कोणा-

असें सत्र सारखें सुरू असतां, एके दिवशीं मोठा चमत्कार घडला. तो असा--एक भिक्षु ( बौद्धयति ) भिक्षा मागत फिरतां फिरतां त्या स्थानापाशीं आला आणि तें रम्य स्थल व स्वच्छ उदकांचें कारंज पाहून आंत शिरला. लगेच द्वारपालानें त्याचे हातपाय बांधून त्याला यमयातनेचा अनुभव घेण्यासाठीं वरिष्ठ अधिकाऱ्याकडे आंत पाठवून दिलें. तेव्हां भिक्षूनें मोठ्या आर्जवानें देवाचें नांव घेण्यासाठीं चार घटकेची मदत मागून घेतली. मध्यंतरीं दुसरा एक कोणी पुरुष तशाच रीतीनें फसून आंत शिरल्यावरून त्यालाही धरून आणिलें होतें. नरकाधिपतीनें त्याचें डोकें चक्रांत अडकावून चेचलें. त्यापासून उडालेली रक्ताची चिरकांडी पाहून व त्या प्राण्याची अंतकाळची भयंकर वेदनायुक्त किंकाळी ऐकून, त्या भिक्षुचें अंत:करण चर्र झालें आणि मानवी जीविताची क्षणभंगुरता व जड देहाची नश्वरता त्याच्या हृत्पटलावर पूर्णपणें बिंबून तो एकदम अर्हत् या श्रेष्ठ पदवीस प्राप्त झाला. चार घटका संपल्यावर शिपायांनीं भिक्षूला पुन: धरलें आणि तप्त तैलाच्या कढईत ढकललें. पण चमत्कार कीं अग्नि आपला स्वभावधर्म सोडून तात्काल शांत झाला; तेल थंड झालें; आणि त्या भिक्षूच्या चेहेऱ्यावर दु:खाच्या ऐवजीं आनंदाचें चिन्ह दिसूं लागलें. हा चमत्कार अधिकाऱ्यांनीं राजाला निवेदित केला. तेव्हां राजाला तें खरें वाटेना. त्यानें स्वत: येऊन तो चमत्कार अवलोकन करतांच तो चकित झाला, आणि त्यानें त्या भिक्षूस बाहेर काढून त्याचे ऐवजीं त्या नरकाधिकाऱ्यास त्या तप्त तैलांत ढकलून मारविलें आणि लगेच त्या नरकस्थानाचा नाश करविला. मग त्या भिक्षूला मोठ्या सन्मानानें आपल्या राजमंदिरांत नेऊन त्याचे पासून त्यानें धर्मोपदेश घेतला. तो धर्मोपदेश ऐकून राजाच्या मनाला पूर्ण उपरति झाली. बुद्धावर त्याची श्रद्धा बसली, आणि तेव्हांपासून बौद्धधर्माचा

---

[ मागील पृष्ठावरून पुढें चालू. ]

चीही मनाई नसल्यामुळें, पुष्कळ लोक आंत जात. परंतु एकदां आंत गेलेला मनुष्य पुन: कधीं येत नसे. अशा रीतीनें फसवून मनुष्यवध करण्यांत अशोकाला मौज वाटे.

संरक्षक, प्रचारक आणि प्रतिपालक होण्याचा त्यानें संकल्प केला[१९]. कुकुटोद्यानांत त्यानें एक चैत्य निर्माण केला आणि ८४००० स्तूप बांधण्याचा निश्चय केलं[२०]. या धार्मिक कृत्यावरून लोक त्याला धर्माशोक ह्मणूं लागले.

**बौद्ध दंतकथा.**

अशोकानें बौद्धधर्माचा उपदेश घेतला, त्यापूर्वी त्याचा धर्म कोणता होता याचा बरोबर समज पडत नाहीं. कित्येकांच्या मतें तो जैन होता. परंतु डा० राजेंद्रलाल ह्मणतात कीं तो हिंदु होता. आणि हें ह्मणणें जास्त सयुक्तिक[२१] दिसतें. बौद्ध दंतकथा अशी आहे कीं, त्यानें पूर्ववयांत बौद्धधर्मी लोकांना मनस्वी छळलें. त्याच्याच आज्ञेवरून बुद्धगया येथील बोधिवृक्ष तोडून टाकण्यांत आला ( Beal's-Si-yu-ki vol. II P. 117) आणि त्याच्याच आज्ञेनें बुद्धाचें जन्मस्थान जी कपिलवस्तु नगरी तिच्या जवळच्या रामपुर नामक गांवांत बुद्धाच्या स्मरणार्थ बांधलेल्या ८ स्तूपांपैकीं ७ स्तूप फोडण्यांत आले. एका शिलालेखांत ह्मटलें आहे कीं, " देवप्रिय राजा प्रियदर्शी याच्या पाकशाळेंत ( रुचकर) पक्कान्नें बनविण्यासाठीं रोज पुष्कळ प्राण्यांचा संहार होत असे" (Epi-

---

१९ या चमत्काराविषयींची हकीकत अशोक अवदान, फाहया याचा प्रवासवृत्तांत आणि स्वियूकी वगैरे सगळ्या ग्रंथांत बहुतेक सारखी आढळते. यावरून अशोकाच्या काळीं त्याच्या स्वभावपरिवर्तनासंबंधानें हीच गोष्ट बहुधा सर्व लोकांच्या तोंडीं असेल असें मानण्यास हरकत नाहीं.

२० मनुष्याच्या शरीरांतल्या हाडांच्या परिमाणूंची संख्या ८४००० कल्पिली आहे. तेव्हां बुद्धाच्या शरीराच्या प्रत्येक परिमाणूवर एकेक याप्रमाणें ८४००० स्तूप बांधावयाचें अशोकाच्या मनांत होतें, असें डा० राजेंद्रलालमित्र लिहितात. अशोक अवदानांत तर अशोकानें तक्षशिला येथील लोकांचे सांगण्यावरून ३,५१,००,००,००० स्तूप बांधिले ह्मणून लिहिलें आहे; पण ही अतिशयोक्ति दिसते.

२१ He was brought up as a worshipper of Agni, Indra, Sûrya, Vâyu &c. showed respect for Brahmins, 60000 of whom he fed daily ( Bhilsa Topes )

graphica Indica vol. II P. 448-9 यावरून तो जैनधर्मी नसावा असें दिसतें. कारण जैनधर्मांत हिंसा वर्ज्य आहे हें सुप्रसिद्धच आहे.

पूर्ववयांत अशोकाचा स्वभाव व वर्तन कसें असे, याविषयींची अतिशयोक्ति वरील कित्येक गोष्टींत दिसून येतें. तथापि

**वृत्तिपरिवर्तन.** एवढें ह्मणण्यास हरकत नाहीं, कीं तो धाडसी, पराक्रमी, स्वच्छंदी, दृढ निश्चयी उर्मट आणि निष्ठुर होता. आणि तो तसा होता, यांत मोठेसें आश्चर्यही नाहीं. लहानपणापासून कुरूप ह्मणून बापानें त्याला टाकलें होतें. बालवयांत आज्ञाधारकतेचें आणि सदाचाराचें जें शिक्षण मिळावयास पाहिजे, तें त्यास बिलकुल मिळालें नव्हतें. आईखेरीज इतर कोणाची देखरेख नसल्यामुळें, ऐषआराम आणि स्वच्छंदीपणा यांची गोडी त्याला लागली होती आणि उनाडपणांत त्याची हळू हळू गति झालेली होती. तरुणपणीं बापाच्या देखरेखीखालीं रहावयाला पाहिजे. पण बापानेंच त्रासून त्याला एकट्याला तक्षशिलेस मोठ्या हुद्याच्या जागीं पाठविलें होतें. अकालीं मोठा अधिकार हातीं आल्यामुळें स्वच्छंदीपणाला उन्मत्तपणाची आणखी जोड झाली होती. तक्षशिला येथें बंड मोडतांना कित्येक जीवांचा झालेला नाश पाहून त्याचें मन घट्ट झालें होतें. तेव्हां पुढें राज्यारूढ झाल्यानंतर, भाऊबंदांचा बंदोबस्त करण्यासाठीं आणखीं कांहीं दुष्कृत्यें त्याच्या हातून घडलीं असलीं, आणि लवकरच कलिंग देशावर[२२] स्वारी करून तो मुलूख पादाक्रांत केला, तेव्हां तेथें शत्रूंची कत्तल करण्यांत त्यानें भूषण मानलें असलें तर त्यांत मोठेंसें नवल नाहीं. अशा रीतीनें दुर्वर्तनांत एकेक पाऊल पुढें टाकीत जो आला, त्याचाच स्वभाव एकाएकीं इतका पालटला कीं, लोक त्याला अत्यंत सत्वशील, धार्मिक, आणि

२२ या कलिंग विजयाविषयीं अशोकाच्या शिलालेखांत एके ठिकाणीं असा उल्लेख आढळतो:—देवप्रिय प्रियदर्शी राजानें राज्यारूढ झाल्यानंतर आठवे वर्षी कलिंग देश जिंकला. तेव्हां एकलक्ष पंनास हजार लोकांना कैद करून आणिलें. लक्ष लोक युद्धांत मारले गेले आणि पुष्कळ लोक नाश पावले (Epigtaphica Indica vol 11 P. 466).

दयाशील समजून देवाप्रमाणें त्याला भजूं लागले, हा जगाच्या इतिहासांतला विलक्षण चमत्कार ह्मटला पाहिजे. याला तुलना इतिहासांत प्रसिद्ध ख्रिस्ती साधू सेंट ऑगस्टाईन याचीच फक्त आहे. कित्येक ग्रंथकार असें ह्मणतात[२३] कीं, आपल्या धर्माचा उगाच गौरव कारण्यासाठींच अशोकाच्या दुष्ट स्वभावाचीं वर्णनें बौद्ध लेखकांनीं लिहून ठेविलीं आहेत. परंतु तसें करण्यास वास्तविक कारण बिलकुल नव्हतें. कारण कीं, अशोकासारख्या धर्मपराङ्मुख राजालाही अत्यंत धार्मिक बनविलें, याहून बौद्ध धर्माची आणखी महती ती काय वर्णावयाची आहे? सारांश, बौद्ध धर्माचा गौरव करण्यासाठीं अशोकाच्या पूर्व स्वभावाला कृष्णस्वरूप मुद्दाम देण्याचें यत्किंचित्‌ही प्रयोजन दिसत नाहीं.

**अशोकाच्या वृत्तिपरिवर्तनाचीं कारणें.**

अशोकाच्या वृत्तिपरिवर्तनाला निरनिराळे लोक निरनिराळीं कारणें लावतात. कोणी ह्मणतात, कीं, उद्दाम यौवनावस्था जाऊन प्रौढावस्थेची छाया जसजशी त्याचेवर पडूं लागली, तसतशी त्याची बुद्धि परिपक्व होऊन, त्याला आपल्या पूर्व कृतीबद्दल पश्चाताप वाटूं लागला. दुसरे कित्येक ह्मणतात कीं, तक्षशिला हा प्रांत पंजाबांत होता, आणि तिकडचे लोक जात्याच कडवे आणि निष्ठुर असल्यामुळें अशोक तिकडे होता तोपर्यंत त्याच्या मनावर तिकडचा संस्कार झाला होता. परंतु तो मगध प्रांतीं परत आल्यावर त्याच्या स्वभावाचें नैसर्गिक मार्दव पुनः प्रादुर्भूत झालें; तिसरे कित्येक ह्मणतात कीं, कलिंग प्रांत जिंकतांना असंख्यात मानवी जीवांचा जो संहार झाला, आणि इतक्या प्राण्यांना ज्या अवर्णनीय यातना भोगाव्या लागल्या, त्या पाहून अशोकाला उपरति झाली. आणि बौद्ध लोकांच्या दंतकथेवरून पाहतां त्याला

---

२३ These stories are absolutely unfounded and were invented to heighten the merit of the Buddhist religion by blackening the character of Asoka before his conversion to that creed ( R. C. Dutt's History of civilization in Ancient India vol. ii P. 3 ).

मुख्य कारण आचार्य उपगुप्त यानें त्याला केलेला धर्मोपदेश हा होय.[२४] मला वाटतें हीं सगळीं कारणें थोड्या थोड्या अंशानें अशोकाच्या वृत्तींत परावर्तन घडवून आणण्यास साधक झालीं असलीं पाहिजेत. आणि शेवटच्या कारणांत दर्शविलेली दंतकथा खरी मानल्यास आचार्य उपगुप्ताचा उपदेश तें परिवर्तन घडवून आणण्यास तात्कालिक निमित्त-मात्र झाला असेल.

**आचार्य उपगुप्त.** आचार्य उपगुप्तासंबंधानें ऐतिहासिक माहिती कांहीं मिळत नाहीं. परंतु त्याच्या संबंधानें ज्या एक दोन दंतकथा बौद्ध-ग्रंथांतून सांपडतात, त्यावरून पाहतां तो मथुरेचा राहणारा व वैश्य जातीचा असावा असें दिसतें. सतरा वर्षांच्या वयांतच तो भिक्षु झाला आणि विसाव्या वर्षी 'अर्हत्' या पदाला पोंचला. हा बहुधा पर्वताच्या गुहेंत राहून ध्यानमग्न असे. प्रसिद्ध चिनी प्रवासी हुएनत्सांग यानें उपगुप्ताच्या बसण्याच्या जागा ह्मणून ज्या कित्येक गुहा त्या काळीं प्रसिद्ध होत्या, त्या सर्व प्रत्यक्ष जाऊन पाहिल्या होत्या असें त्याच्या प्रवासवर्णनांत लिहिलेलें आढळतें.[२५] पुढें अशोक राजाची व उपगुप्ताची गांठ पडल्यावर अशोकानें त्याला आपल्या राजधानीच्या नगरींत सुंदर राजवाड्यांत राहण्याविषयीं अत्याग्रहपूर्वक विनंति केली. तथापि 'आमची आपली गुहा उत्तम आहे' असें त्यानें उत्तर दिलें. तेव्हां राजानें आपल्या राजधानींतच एक प्रस्तरमय गुंफा त्याचेसाठीं निर्माण करून दिली.[२६] आचार्य उपगुप्त हा मोठा जितेंद्रिय व परोपकारी साधु पुरुष होता. याच्या संबंधाची एक अपूर्व कथा बौद्धग्रंथांत आढळते, ती येथें देतों.

---

२४ Beal's Si- Yu- Ki. vol. II p. 88—90.

२५. Si- Yu--Ki vol. II p. 93.

२६. Si-- Yu-- Ki. vol. II p. 181—2. या गुंफेचें नांव वेणुवन असावें असें दिसतें. या वेणुवनाचा उल्लेख अशोक अवदान नामक ग्रंथांत केला आहे.

**वासवदत्ता.**

मथुरा नगरींत वासवदत्ता ह्मणून कोणी एक गणिका होती. एके दिवशीं तिची एक दासी उपगुप्ताच्या दुकानीं (उपगुप्त हा मूळचा वैश्य होता ह्मणून वर सांगितलेंच आहे.) काहीं सुगंधि पदार्थ घेण्यासाठीं आली व ते पदार्थ घेऊन परत गेली. तिच्यापासून वासनदत्तेला उपगुप्ताच्या सौंदर्यादि गुणांची माहिती कळली व ती कळल्यापासून त्याला पाहण्याविषयीं ती फार आतुर झाली. वासवदत्तेनें आपल्या दासीबरोबर प्रेमपत्रिका पाठवून कळविलें कीं, 'आपलें दर्शन आणि सहवास यांचा लाभ व्हावा अशी या गरीब दासीची फार इच्छा आहे.' यावर त्यानें उत्तर पाठविलें कीं, 'मी गरीब मनुष्य मला पाहून काय करावयाचें आहे? मला पाहण्याचे दिवस पुढें येतील' त्यावर तिनें परत निरोप पाठविला कीं, 'आपणाजवळून एका कपर्दिकेचीही अपेक्षा मी करीत नाहीं. केवळ दर्शन आणि संगतिसुख पाहिजे, याहून दुसरें कांहीं नको. यावरही त्यानें पूर्वींच्या सारखाच जबाब पाठविला. पुढें कांहीं दिवसांनीं कांहीं अकल्पित गोष्ट घडून आली. वासवदत्तेचा कोणी एक श्रीमंत तरुण यजमान तिच्या महालांत निद्रावश असतांना, त्याच्या कोणी वैऱ्यानें मुकाट्यानें जाऊन त्याचा खून केला. दुसरे दिवशीं राजदूत चौकशीला आले, तेव्हां त्यांनीं चौकशी अंतीं ठरविलें कीं, वासवदत्तेनेंच द्रव्यलोभामुळें यजमान निद्रिस्त असतां, त्याचा खून करविला व त्याप्रमाणें तिला बंदिवान करून त्यांनीं राजद्वारीं नेलें. तेथेंही तसाच निकाल होऊन तिचे हात, पाय, नाक, व कान तोडून तिला स्मशानांत टाकून द्यावी, ह्मणून शिक्षा सांगण्यांत आली, व त्याप्रमाणें लागलीच ती अंमलांतही आली. परंतु तिची दासी मात्र पूर्व उपकृति स्मरून तिची शुश्रूषा तशा स्थितींत सुद्धां करीत राहिली होती. इकडे उपगुप्ताला ही हकीकत कळली, तेव्हां तो आपल्या एका सेवकाला घेऊन तेथें स्मशानांत गेला. दासीनें लागलीच अमके अमके गृहस्थ आले आहेत ह्मणून आपल्या यजमानणीला सांगितलें. अशा छिन्नविच्छिन्न देहाच्या स्थितींत त्याच्या दृष्टीस आपण पडत आहों, हें पाहून ती अति लज्जित आणि दुःखी झाली. उपगुप्त तिच्याजवळ जाऊन बसला.

तेव्हां ती ह्मणाली—महाराज, जेव्हां हा देह नवविकसित कुसुमाप्रमाणें तारुण्यानें फुलून राहिला होता, आणि बहुमोल वस्त्रालंकारांनीं भूषित होऊन, कामी जनांचीं मनें वेधून घेत होता, तेव्हां मी विनंति केली असतांही आपण मला दर्शन दिलें नाहीं, आणि आतां हाय हाय! ही अशी कष्टमय दशा दुर्दैवानें प्राप्त झाली. आनंद, सुख, सौंदर्य सगळ्यांना मी मुकलें, अशा माझ्या हीन स्थितींत हा छिन्नविच्छिन्न झालेला तिरस्करणीय देह पाहण्यासाठीं कशाला आला? ' हें मर्मभेदक व हृदयद्रावक वाक्य ऐकून त्यानें उत्तर केलें—' वासवदत्ते, भेटण्याची खरी वेळ हीच आहे. मनुष्याचें ऐहिक सुख कसें नाशवंत असतें, तें पाहण्यासाठीं मी मुद्दाम आलों आहे ' असें ह्मणून मरणोन्मुख होऊन पडलेल्या गणिकेस त्यानें धर्मोपदेश केला. तिच्या दुःखावेगानें अस्वस्थ झालेल्या मनाला तेणेंकरून शांति प्राप्त झाली, आणि तिनें बुद्ध, धर्म व संघ या त्रयींचा आश्रय करून प्राणांचें विसर्जन केलें.[२७]

---

२७ या धर्मोपदेशाचा भावार्थ मि० पॉल कॅरस यांनीं आपल्या Gospel of Buddha नामक ग्रंथांत इंग्रजींत येणें प्रमाणें दिला आहे—" I have seen with mine eyes the Tathagata walking upon earth and teachingmen his wonderful doctrine. But you would not have listened to the words of righteousness while surrounded with temptations, while under the spell of passion and yearning for worldly pleasures. You would not have listened to the words of the Tathagata, for your heart was wayward and you set your trust on the charm of transient forms. The chams of a lovely form are treacherous and quickly lead into temptations which have proved too strong for you. But there is a beauty which will not fade, and if you but listen to the doctrine of our Lord Buddha, you will find that peace which you would never have found in the restless world of sinful pleasures. '

# प्रकरण ५.

## धर्माशोक.

**बोधिवृक्षच्छेदन.** राजाच्या वृत्तींत जो हा विलक्षण फेरफार घडला, तो लोकांस एका प्रकारें मानवला. परंतु त्यानें धर्मांतर केलें आणि विशेषत: बौद्धधर्माला राष्ट्रीयत्व दिलें, हें पाहून हिंदू प्रजेला फार वाईट वाटलें. अशोक दररोज बोधिवृक्षाच्याखालीं बसून ध्यानमग्न राहत असे, तेवढेंसुद्धां प्रत्यक्ष त्याची राणी तिष्यरक्षिता हिच्यानें पाहवेना. तेव्हां तिनें आपल्या माणसांकडून एके दिवशीं तो वृक्ष गुपचिप तोडविला. दुसरे दिवशीं नित्याप्रमाणें राजा त्या वृक्षाखालीं बसण्यासाठीं गेला, तों तो वृक्ष तोडलेला त्याच्या दृष्टीस पडला. अशोकाची पूर्ववृत्ति यावेळीं कायम असती तर त्यानें या अपराधाबद्दल राजवाड्यांतल्या एकंदर लोकांना हाल हाल करून क्रूरपणानें ठार मारिलें असतें. परंतु आचार्य उपगुप्ताच्या धर्मोपदेशामुळें, त्याची वृत्ति इतकी शांत झाली होती कीं, त्याबद्दल तो कोणास चकार अक्षरसुद्धां बोलला नाहीं. मात्र मनांतल्यामनांत अति कष्टी झाला. कोणी ह्मणतात कीं, त्या वृक्षाला पुन: पालवी फुटेपर्यंत त्यानें उपोषण केलें. तें कांहीं असो. धर्मवासनेच्या योगानें त्याच्या वृत्तींत झालेला हा पालट विशेष ध्यानांत धरण्याजोगा आहे यांत शंका नाहीं.

**भिक्षूंचा अनाचार.** अशोकानें जाहिरनामा फिरवून बौद्धधर्माला राष्ट्रीय स्वरूप दिलें, येवढेंच नाहीं तर त्या धर्माची उन्नति व प्रसार करण्यासाठीं त्यानें जणूं काय हातीं कंकणच बांधलें होतें. बौद्धभिक्षू व भिक्षुणी यांचेविषयीं तो विशेष आदर आणि श्रद्धा बाळगूं लागला व त्यांना द्रव्यद्वारा साहाय्य देऊन त्यांच्याकडून धर्म प्रसार करविण्याचें त्यानें आरंभिलें. राजाचें उदाहरण पाहून कित्येक सरदार मंडळींसही त्याचें अनुकरण करण्याची बुद्धि झाली. दिवसेंदिवस ब्राह्मणाचें वर्चस्व कमी कमी होऊं लागलें, आणि त्याबरोबर त्यांची प्राप्तिही कमी झाली. तेव्हां आपली

धडगत नाहीं असें पाहून, कित्येक धूर्त ब्राह्मणांनीं हळू हळू स्वधर्माविषयीं शिथिलता आणि बौद्धधर्माविषयीं आदरबुद्धि दाखविण्यास प्रारंभ केला. कित्येकांनीं भगवीं वस्त्रें धारण करून भिक्षू ह्मणून बौद्ध विहारांत हळूच प्रवेश केला, आणि पिसें लावून मोर ह्मणवून घेणाऱ्या डोमकावळ्याप्रमाणें बौद्धभिक्षूंमध्यें हे ब्राह्मण भिक्षुक जाऊन मिसळले, व बौद्धाप्रमाणेंच सगळे आचार करूं लागले. इकडे बौद्ध भिक्षूमध्येंही कित्येक अनाचारांचा प्रवेश झालेला होता. आणि त्यांना कोणी शास्ता राहिला नव्हता. मोग्गलीपुत्र तिष्य बौद्धभिक्षूंचा सभापति केवळ नांवाला होता; परंतु त्याचें कोणी ऐकेनासें झाल्यामुळें तोही विरक्त होऊन कोठें अरण्यांत जाऊन राहिला होता. हा सगळा प्रकार अशोकाला कळला, तेव्हां त्यानें तात्काळ एका अधिकाऱ्याच्या हातीं भिक्षुमंडळीला निरोप पाठविला कीं, ' हा सगळा घोटाळा मोडण्यासाठीं लवकरच एक सभा भरविण्यांत येणार आहे. तेव्हां वादविवाद करण्याची कोणाची इच्छा असल्यास त्यानें तशा तयारीनें यावें. ' परंतु त्या अधिकाऱ्यानें तो निरोप कळवितांना आपल्या पदरचे शब्द घालून ह्मटलें कीं, ' राजाचा हा हुकूम जो उल्लंघील त्याचा शिरच्छेद करण्यास आह्मांस अखत्यार दिला आहे.' भिक्षुमंडळींतही एकजण तापट स्वभावाचा होता, तो त्या अधिकाऱ्याला कांहीं टाकून बोलला, त्यावरून बोलाचाली होऊन, त्या अधिकाऱ्याला संताप चढला व त्याच्या भरांत त्यानें आपली तरवार उपसून त्या भिक्षूचा शिरच्छेद केला. वादविवाद तर पुढेंच राहिला. आज हें नसतें विघ्न मात्र उपस्थित आलें.

**एक नवें विघ्न.**

ही हकीकत ऐकून अशोकाला फार दु:ख झालें, आणि या हत्त्येचें पातक आपले माथीं आलें हें पाहून तो स्वतःचीं निर्भर्त्सना करून घेऊं लागला. त्यानें मुख्य मुख्य विद्वान् भिक्षूंची सभा भरवून त्याबद्दल प्रायश्चित्त काय ह्मणून विचारलें. तेव्हां त्यांच्यामध्येंही मतभेद झाला. कित्येकांच्या दृष्टीनें राजा निर्दोषी ठरला आणि कित्येक त्याला

**प्रायश्चित्ताचा प्रश्न.**

दोषी ठरवूं लागले. कांहींच निर्णय होईना तेव्हां मोग्गलीपुत्र तिष्य याला राजानें बहुमानपुरःसर आणिलें आणि त्याच्या चरणाचें वंदन करून हात जोडून त्याचे पुढें उभा राहिला, आणि नम्रपणें प्रायश्चित्ताचा प्रश्न त्याचे पुढें मांडिला. त्यानें सगळी हकीकत ऐकून घेऊन सांगितलें कीं, ज्याअर्थी शिरच्छेद करण्याविषयीं खरोखर राजाज्ञा नव्हती, आणि त्या अधिकाऱ्याला पाठविण्यांत राजाचा हेतू अत्यंत सरळ आणि शुद्ध होता, त्याअर्थी राजाकडे त्याचा कांहीं एक दोष नाहीं. कोणत्याही धर्माधर्माचा विचार मनांतल्या हेतूवर पुष्कळ अंशीं अवलंबून असतो, म्हणून पापपुण्याचा विचार ठरवितांना हेतूचें परीक्षण प्रथम केलें पाहिजे. हा निर्णय जरी सर्वांना पसंत पडला नाहीं, तरी मोग्गलीपुत्राच्या विरुद्ध बोलण्याचें धाडस कोणास होईना. तेव्हां सर्वांनीं मुकाट्यानें त्याला संमति दिली.

**बौद्ध महासभा.**

या गोष्टीनंतर सात दिवसांनीं (इ० स० पू० २४१ यावर्षी) बुद्धांचीं महासभा भरली. गंगातीरीं ज्या उद्यानांत मोग्गलीपुत्र तिष्य उतरला होता त्याच उद्यानांत एक विस्तीर्ण मंडप उभारला होता, त्यांत सभासदांच्या योग्यतेनुरूप आसनें मांडून ठेविलीं होतीं, व एका बाजूस राजाकरितां सिंहासन ठेविलें होतें. मोग्गलीपुत्र तिष्य याची सभापतीचे जागीं नेमणूक झाल्याप्रमाणें त्यानें मुख्य आसन विराजित केलें होतें. भिक्षूंची परीक्षा हा सभेचा प्रथम विषय होता. एकेक भिक्षू सभापतीपुढें जाई व सभापति त्याला धर्मसंबंधीं कांहीं प्रश्न विचारी. त्यांचीं उत्तरें त्रिपितक ग्रंथाच्या विरुद्ध जो कोणी देई त्याला तत्काळ सभेंतून बाहेर घालवून दिलें जाई, आणि त्याचीं भगवीं वस्त्रें हिसकून घेऊन व त्यास श्वेतवस्त्रें देऊन त्याला परत ब्राह्मण समाजांत पाठविण्यांत येई. याप्रमाणें ६०००० भिक्षूंना बौद्ध समाजांतून घालवून देण्यांत आलें. राजा हा प्रकार मुकाट्यानें पहात होता. याप्रमाणें या सभेनें आपल्यांतले सगळे डोमकावळे हाकून लावून खरे भाविक बौद्धभिक्षु निवडून काढिले. नंतर सभेनें दुसरा विषय हातीं घेतला. हा विषय

ह्मणजे धर्माला स्थिरता आणणें. या कार्यासाठीं सभापतीनें विद्वान् असे एक हजार भिक्षू निवडून काढिले आणि त्यांच्या साह्यानें त्रिपितक नामक शास्त्र ग्रंथाच्या शोधनाचें काम हातीं घेतलें. त्रिपितक ह्मणजे तीन ग्रंथांचा समुदाय. हे तीन ग्रंथ ह्मणजे बुद्धाच्या मृत्यूनंतर महाकाश्यप यानें सभा भरवून ठरविलेलीं सूत्रें, विनय आणि अभिधर्म असे तीन होत. या त्रिपितक शास्त्राच्या संशोधनाचें काम या हजारजणाच्या निवडक मंडलानें नऊ महिने खपून तडीस नेलें.[२८]

**निरानिराळ्या ठिकाणचा बौद्धधर्म.**

अशोकाच्या वेळीं बौद्धधर्माच्या निरनिराळ्या पंथाचें संशोधन होऊन जें एक मत स्थिर झालें तेंच अजून सिहलद्वीपांत प्रचलित आहे. अशोकाच्या मृत्यूनंतर त्याच्या राज्याची ज्याप्रमाणें वाताहत झाली त्याचप्रमाणें धर्म-मतांतही घोटाळा होऊन पुनः नानापंथ आणि नाना विचार उपस्थित झाले. बौद्धधर्माचें हें विकृत स्वरूप अद्यापि चीन, जपान, तिबेट तार्तरी वगैरे देशांत पहावयास सांपडतें. ब्रह्मदेश, सयाम, आणि सिहलद्वीप या देशांत जो बौद्ध धर्म हल्लीं आहे, तोच अशोकानें संशोधन केलेला बौद्ध धर्म होय, आणि काल-गतीनें इतर आचार व मतें घुसून अशुद्ध झालेला बौद्ध धर्म पाहावयाचा असेल तर तो तिबेट, नेपाळ, जपान वगैरे देशांत आढळेल असें साधा-रणपणें ह्मणण्यास हरकत नाहीं.

**धर्मोपदेशक-प्रेषण.**

धर्मशास्त्रसंशोधनाखेरीज धर्मप्रसाराचा दुसरा एक उपाय महासभेनें सुचविला होता. तो देशोदेशीं धर्मोपदेशकांना पाठ-वून त्यांच्या द्वारें धर्माचा प्रसार करणें हा होय. दीपवंशनामक बौद्ध ग्रंथाच्या आठव्या आणि महा वंशाच्या बाराव्या अध्यायांत अशोकानें देशोदेशीं पाठविलेल्या धर्मोपदेशकांचीं नांवें येणेंप्रमाणें दिलेलीं आढळतात.

---

२८. विनयपितक यांत भिक्षू व भिक्षुणी यांचा नित्याचार वर्णिला आहे; सूत्र पितकांत उपासकासंबंधाचीं सूत्रें आहेत; आणि अभिधर्मपितकांत बौद्धदर्शन (Philosophy of Buddhism ) आहे.

| देश. | धर्मोपदेशकाचें नांव. |
|---|---|
| काश्मीर आणि गांधार (काबूल नदीचें दक्षिण तट). | मजू झान्तिका. |
| महीश ( म्हैसूर ) | महादेव. |
| वनवासि ( ? )[1] | रक्षित. |
| अपरस्तक अथवा अपरान्तक[2] | धर्मरक्षित. ( हा ब्याक्ट्रिया येथें राहणारा होता. ) |
| महाराष्ट्र | महाधर्मरक्षित. |
| योन [ सीरिया वगैरे ग्रीक राष्ट्रें ] | महारक्षित. |
| हिमवन्त [ हिमालयाचा पायथा ] | मज्झिम, दुरभिसार, सहदेव आणि मूलकदेव. |
| सुवर्णभूमि [ ब्रह्मदेश ] | सेन आणि उत्तर. |
| सिंहलद्वीप [ सिलोन ] | महेंद्र [ महिन्द ] इ० |

१ मि. ऱ्हिस डेविड्स साहेब ह्मणतात कीं, वनवासि हा प्रदेश रजपुतान्यांतल्या उजाड अरण्याच्या सीमेवरचा भाग असावा.

२ पंजाबच्या पश्चिमेकडचा प्रदेश. [ अपरान्त=कोंकणपट्टी रघु ४. श्लो. ५३–५८ संपादक. ]

धर्मोपदेशक पाठवून धर्मप्रसार करण्याची कल्पना मुळची बुद्धांची होती, असें यावरून दिसतें, आणि जनरल कनिंगह्याम या विद्वान्, ख्रिस्ती शोधकानेंही ही गोष्ट निरभिमानतया कबूल केली आहे. सदर ग्रंथकार लिहितो.[२९] The proselytizing zeal of Asoka is more worthy of record, as it anticipated by nearly three centuries one of the most characteristic institutions of the early Christian Church. अशोकाचें उदाहरण पाहून पुढें तीनशें वर्षांनीं ख्रिस्त्यांनीं आपले धर्मोपदेशक पाठविण्यास प्रारंभ केला, ही गोष्ट हल्लींच्या कित्येक दुराग्रहग्रस्त ख्रिस्ती मिशनरींनीं लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे.

२९ Bhilsa Topes, P. 123.

# प्रकरण ६.

## महिन्द संगमित्रा आणि कुनाल.

लंका ह्मणून ज्या बेटाचा रामायणांत उल्लेख आहे, तें बेट सिंहलद्वीप हेंच असेल, तर त्याचा हिंदुस्थानाशीं संबंध फार प्राचीनकाळापासून आहे असें ह्मटलें पाहिजे. दीपवंश ह्मणून जो ग्रंथ आहे, त्यांत ह्या बेटांत राक्षस राहत असत असा उल्लेख आढळतो. यावरून लंका हीच असावी असें वाटतें. तथापि अनेक पंडितांचीं मतें याच्या विरुद्ध आहेत. ह्मणून या वादग्रस्त विषयास येथेंच सोडून आपण त्या बेटाच्या अर्वाचीन इतिहासाकडे वळूं. या बेटाचे मूळचे रहिवासी रानटी लोक होते यांत शंका नाहीं, मग ते रामायणांत वर्णन केलेले राक्षस असोत, किंवा आफ्रिकेंतल्या नीग्रो, स्वाली वगैरे लोकांप्रमाणें दुसरे कोणी असोत. या रानटी लोकांना हिंदुस्थानांतल्या एका राजानें जिंकून त्या बेटाचें स्वामित्व बळकाविलें होतें, ही गोष्ट खरी आहे. अशोकाचे वेळीं या बेटाचें आधिपत्य तिष्यनामक राजाकडे होतें. त्यानें अशोकाची कीर्ति ऐकली होती, आणि त्याच्यासारखें आपण व्हावें अशा ईर्ष्येनें तो अशोकाप्रमाणें स्वतःही 'देवानां प्रिय' ह्मणवून घेऊं लागला.

**सिंहलद्वीप**

**महिन्द.**

अशोकानें जे धर्मोपदेशक देशोदेशीं पाठविले ह्मणून वर सांगितलें आहे, त्यांत सिंहलद्वीपास महिन्द ( महेन्द्र ) याची नेमणूक झाली ह्मणून वर सांगितलें आहे. हा महिन्द अशोकाचा पुत्र होय. अशोकाला राज्याभिषेक झाल्यानंतर सहा वर्षांनीं या राजपुत्राचें मन ऐहिक गोष्टींवरून उडून परमार्थाकडे वळल्यावरून त्यानें भिक्षुव्रताचा अंगीकार केला होता. अशोकाविषयीं आणि बौद्धधर्माविषयीं सिंहलद्वीपचा राजा तिष्य याचे ठायीं फार पूज्यबुद्धि होती.[३०] या कारणानें त्यानें महिन्दाचा फार चांगला आदरसत्कार केला. महिन्दानें आपल्या बरोबर आणखी कित्येक भिक्षू व पाटलिपुत्र येथें महासभेनें शोधून नवीन तयार केलेल्या त्रिपितकाची पोथी व तिजवरचे भाष्यग्रंथ हेही घेतले होते.

---

३० या पूर्वीच अशोक आणि तिष्य यांच्यामध्यें पत्रव्यवहार होऊन परस्परांचे वकील परस्परांचे दरबारीं आले होते. या तिष्यराजानें अशोकाच्या वकीलाच्या हातानें आपणास राज्याभिषेक करवून घेतला होता, असें मि. ऱ्हिस डेव्हिड्ससाहेब लिहितात.

**सिंहलाधिप तिष्य** यानें **महिन्दा**पासून बौद्धधर्माची दीक्षा घेतली आणि आपल्या राज्यांत ठिकठिकाणीं सुंदर सुंदर विहार आणि स्तंभ उभारले. **अनुराधपुराच्या** जवळच **महिन्दा**साठीं विहार बांधला होता. त्याचा अवशिष्ट भाग अद्याप अस्तित्वांत आहे. हें स्थान फार रम्य आहे. चारी बाजूंनीं उंच पर्वत आणि मधील सखल भागीं दाट झाडी असल्या-मुळें हें स्थान एकांतवासाला अगदीं योग्य आहे, या ठिकाणीं **महिन्द** ध्यानधारणा करीत असे. याच ठिकाणीं त्याचें देहावसान झालें, आणि याच ठिकाणीं त्याच्या देहाची रक्षा त्याच्या शिष्यसमूहानें जतन करून ठेविली आहे. हिंदुस्थानांत मुसलमानांनीं स्वाऱ्या करून तेथलीं देवळें, आश्रम, समाधि वगैरेचा विध्वंस केला; पण या बेटांत त्यांचा शिरकाव न झाल्यामुळें दोन हजार वर्षांपूर्वीचे बौद्धांचे विहार, स्तूप, समाधि वगैरे सर्व जे कांहीं कालाच्या तडाक्यांतून वांचलें, तें आज तागाईत जसेंचें तसें आहे.

**संगमित्रा**

सिंहलराज तिष्य यानें बौद्धधर्माची दीक्षा घेतली, तेव्हां त्याची राणी अनुला[३१] आणि तिच्या सखी यांनींही आपणांस भिक्षुणी व्हावयाचें अशी इच्छा दर्शविली. तेव्हां **महिन्द** ह्मणाला—‘ स्त्रियांना दीक्षा देण्याचा आह्मांला अधिकार नाहीं. यासाठीं माझी भगिनी **संगमित्रा** ह्मणून आहे. तिला बोलावतों. ती तुमची इच्छा पूर्ण करील. ’ तिष्यराजानें लागलीच आपले सेवक पाठवून **संगमित्रा**, व तिच्या सोबतिणी उत्तरा, हेमा, **मालागल्ला**, **अग्निमित्रा**, तपा, पर्वतछिन्ना, **मल्ला**, आणि धर्मदासी वगैरे भिक्षुणींना आणविलें. **संगमित्रेनें** तिष्याच्या राणीस व इतर स्त्रियांस दीक्षा देऊन त्यांची इच्छा पूर्ण केली.[३२]

---

३१ अनुला ही तिष्य राजाची मेहुणी होती, असे डा. **कोपलस्टन** हे आपल्या Buddhism primitive and present in Magadh and Ceylon नामक ग्रंथांत लिहितात.

३२ प्रो. **ओल्डनबर्ग** हे **विनयपितकाच्या** प्रस्तावनेंत लिहितात कीं, **महिंद** व त्याची बहीण **संगमित्रा** यांनीं **सिंहलद्वीपास** जाऊन बौधद्धर्माचा तेथें प्रसार केला ही गोष्ट मुळींच खोटी आहे. त्यांच्या मतें तो धर्म आपोआप पसरत पसरत त्या बेटांत गेला. डा. **कोपल्स्टन्** यांच्या मत याच्या उलट आहे. आणि आपल्या मताच्या पुष्टीकरणार्थ **कोपल्स्टन्** साहेबांनीं बराच पुरावाही आणिला आहे, तो त्यांच्या ग्रंथांत ( पृष्ठ ३२३-४ ) पहावा.

महिन्दाच्या प्रयत्नास सिंहलद्वीपांत इतकें यश येण्यास त्याच्या बापाचा नांवलौकिक, किंवा सिंहलराज तिष्य याची अशोकाविषयींची पूज्यबुद्धि हींच कारण झाली, असें नाहीं. राजपुत्र असून धर्माविषयीं त्यानें दाखविलेली निःसीम भक्ति, आणि तत्प्रीत्यर्थ त्यानें केलेला स्वार्थत्याग, त्याची शांत आणि गंभीर वृत्ति, त्याची विलक्षण बुद्धिमता आणि अलौकिक स्मरणशक्ति, त्याची ज्ञानलालसा आणि सदाचारपरता इ० गुणच लोकांच्या मनावर बौद्ध धर्माचा ठसा उठविण्यास विशेष कारणीभूत झाले. हे गुण त्याचे आंगीं नसते, तर नुसत्या वडिलाच्या नांवलौकिकाच्या शिफारशीनें किंवा तिष्याच्या मध्यस्तीनें इतकें कार्य खचित झालें नसतें[33]. यावेळेस महिन्द आणि संगमित्रा यांचीं वयें अनुक्रमें २० व १९ वर्षें अशीं होतीं. एवढ्या अल्पवयांत त्यांनीं दाखविलेली धर्माविषयीं विलक्षण आस्था, आणि स्वार्थत्यागाची बुद्धि ही अलौकिक होती असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. अशा मनोहर मूर्तींच्या तोंडून निघणाऱ्या शीतल, मधुर व भक्तिरसानें थबथबलेल्या उपदेशामृताचें आकंठ पान करून तृप्त व्हावें, असें कोणास वाटणार नाहीं? त्या दोघा बंधु भगिनीला पाहून हे परमेश्वरानें प्रत्यक्ष आपले देवदूतच मनुष्य जातीच्या उद्धारार्थ या लोकीं पाठविले आहेत कीं काय असें लोकांस वाटावें यांत खरोखर कांहीं नवल नाहीं. २० वर्षांच्या अल्पवयस्क एका तरुणानें, त्याच वयाच्या आपल्या बहिणीच्या साह्यानें सिंहलद्वीपा-

---

३३. This Mahinda must have been a man of extraordinary power. He must have combined the tone and deportment of the calm hermit, the prodigious memory of the trained student, and the active capacities of a statesman. The ideal of Buddhism was embodied in him, as tradition represents him, & he, if our history is trustworthy at all, he must have really embodied it in no small degree or he could not have won so rapid & complete a success—Dr. Copleston's Buddhism primitive and present P. 327.

साररुया दूर प्रदेशीं जाऊन तेथील लाख दोन लाख परधर्मी लोकांच्या मनांत केवळ उपदेशाच्या योगानें कित्येक शतकेंपर्यंत पोटाशीं धरलेला आपला धर्म टाकून नव्या धर्माचा स्वीकार करण्याची प्रेरणा करावी ही गोष्ट सामान्य नव्हे, तर जगाच्या दुसऱ्या अनेक अद्भुत चमत्कारांतच गणली जाण्याच्या योग्यतेची आहे याबद्दल कोणीही विचारी माणूस शंका घेईल असें आह्मांस तरी वाटत नाहीं.

**बोधिवृक्ष.**

संगमित्रेनें आपल्या बरोबर आणखी एक अमूल्य चीज सिंव्हलद्वीपास नेली. बुद्धगया येथें ज्या अश्वत्थ वृक्षाखालीं शाक्य गोतमा (बुद्ध) ला दिव्यज्ञान प्राप्त झालें, आणि तेव्हांपासून ज्याला 'बोधिवृक्ष' अथवा ज्ञानवृक्ष असें नांव मिळालें होतें, त्या अश्वत्थ वृक्षाचें एक कलम तिनें आपल्या बरोबर घेतलें होतें. या कलमापासून पुढें जो प्रचंड वृक्ष झाला तो आज दोन हजार वर्षें अस्तित्वांत आहे. सगळ्या जगांत याच्या इतका जुना वृक्ष नाहीं. ख्रि० स० पू० २४९ वर्षें संगमित्रेनें कलम लाविलें होतें. ह्मणजे आज तो वृक्ष २१४७ वर्षांचा आहे असें ह्मटलें पाहिजे. इतका जुना वृक्ष झाला असून तो अद्याप वाढत आहे असें ह्मणतात!! या वृक्षासंबंधानें सर इमर्सन टेनेंट यांनीं असें ह्मटलें आहे.

"Ages varying from one to four thousand years have been assigned to the Baobabs of senegal, the Encalyptus of Tasmania, the Dragon tree of Orotava, the Wellingtonia of California and the chestnut of Mount Etna. But all these estimates are matter of conjecture; whereas the age of the Bo-tree is matter of record, its conservancy has been an object of solietude to successive dynasties, and the story of its vicis_ situdes has been preserved in a series of continnous chronicles, among the most anthentic that have been handed down by mankind. Compared with it the oak

of Ellerslie is but a sapling, and the Conqueror's Oak in Windsor forest barely numbers half its years.....The Bo-tree is older than the oldest of these by a century, and would almost seem to verify the prophecy pronounced when it was planted that it would flourish and be green for ever,[३४] ".

भाविक बौद्ध ग्रंथकारांनीं या वृक्षाबद्दल असें लिहून ठेविलें आहे कीं, हा वृक्ष चिरकाल हिरवागार राहील हें त्यांचें वाक्य आलंकारिक आहे. ह्मणजे त्यांनीं बोधि वृक्ष हा बौद्ध धर्माचा निदर्शक ह्मणून घेऊन तद्द्वारा बौद्ध धर्म अविनाशी आहे, असें या वाक्यांत ध्वनित केलें आहे. आणि सिंहलद्वीपापुरता विचार केला ह्मणजे या वाक्याचा स्पष्टार्थ व ध्वनितार्थ दोन्ही खरे झालेले दिसतात. कारण सिंहलद्वीपांत संगमित्रेनें नेलेली बोधिवृक्षाची शाखा वृद्धिंगत होऊन ती आजमितीस जशी कायम आहे, तशीच महिन्दानें नेलेली बौद्ध धर्माची शाखाही टिकून राहिली आहे. हिंदुस्थानांत मात्र कोणत्याही अर्थानें त्या वाक्याची सत्यता आजमित्तीस दिसत नाहीं. आमच्या देशांत बौद्ध धर्महीं उरला नाहीं मुळचा बोधिवृक्षही सन १८९९ सालीं नष्ट झाला असें सांगतात[३५]. चिनी प्रवाशांनीं या मूळ वृक्षाचें वर्णन लिहून ठेविलें आहे. याच वृक्षाची एक शाखा ब्रह्मदेशच्या राजानें मुद्दाम दूत पाठवून इ. स. १८३३ सालीं आपल्या देशीं नेली असें सांगतात. या मूळच्या बोधिवृक्षाला बौद्ध राजे इतके पूज्य मानितात कीं, त्याच्या दर्शनासाठीं शेंकडों कोसांवरून ते येत आणि त्याच्यावर मणोगणती दूध आणि अत्तरादि सुगंधि द्रव्याच्या घागरी ओतीत. परंतु बौद्ध धर्माचा या देशांत लोप झाला तसा हा वृक्ष जणूकाय आपल्या विपन्नावस्थेला कंटाळून आपला जड देह टाकिता झाला. हल्लीं त्या जागेवरच थोड्या वर्षांपूर्वी एक नवी फांदी लाविली होती तिचा आतां मोठा वृक्ष झालेला दिसतो. पण हा वृक्ष ह्मणजे पुरातन काळचा बोधिवृक्ष नव्हे हें वाचकांस सांगावयास नकोच.

---

३४ Ceylon II p. 613et seq.

३५ बाबू श्रीकृष्णविहारी सेन प्रणीत अशोक चरित्र पृ. ७६.

अशोकाला अनेक पुत्र होते, असें त्याच्या स्तंभलेखावरून दिसतें. कारण त्या लेखांत ऐके ठिकाणीं " दालकानामपि च राजपुत्र कुनाल मे " [ माझ्या पुत्रांचेही ] असे अनेकवचनी शब्द आहेत. आपल्या पुराणांत अशोकाचे मागून त्याचा सुयशा नांवाचा मुलगा सिंहासनारूढ झाला, ह्मणून उल्लेख आहे. हुएनत्सांग ह्मणतो कीं, त्याचा एक धर्मवर्धन नांवाचा मुलगा गांधार ( कंदाहार ) प्रांतीं मुख्याधिकारी ह्मणून गेला होता. दीपवंश व महावंश या बौद्ध ग्रंथांत पुत्र महिंद व कन्या संगमित्रा यांनीं बौद्धधर्माची दीक्षा घेऊन सिंहलद्वीपांत त्या धर्माचा प्रसार केला असें लिहिलें आहे; परंतु हुएन ह्मणतो कीं, महिंद अशोकाचा सावत्र भाऊ होता.[३५] अशोक अवदान ग्रंथावरून पहातां त्याला कुनाल नांवाचा एक पुत्र होता, असें दिसतें. त्याचा वृत्तांत एकेठिकाणीं येणेंप्रमाणें दिलेला आढळतो.[३६]

या मुलाचे डोळे कुनालपक्ष्याच्या डोळ्याप्रमाणें पाणीदार आणि काळेभोर होते, यावरून त्याचें कुनाल असें नांव पडलें होतें. त्याचें कांचनमाला नांवाच्या कुमारीशीं लग्न झालें होतें; परंतु लहानपणापासून बापाच्या धर्मशिक्षणाखालीं वाढल्यामुळें त्याचें लक्ष संसारावरून उडून तो विरक्त झाला होता. त्याचा स्वभाव अतिशय सौम्य असल्यामुळें तो राज्यकारभाराच्या वगैरे भानगडींत बिलकुल पडत नसे. सदासर्वदा धर्मचिंतन आणि धर्मचर्चा यांत तो निमग्न असे. प्रसंगवशात् त्याची सावत्र आई तिष्यरक्षिता हिची दृष्टि त्याचेकडे गेली आणि त्याचें सौंदर्य पाहून कामवासनेनें ती पीडित झाली. तिनें त्याचें मन आकर्षण करण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केले पण सारे व्यर्थ. शेवटीं क्रोधानें संतप्त होऊन त्याचा नाश करण्याचा विचार ती करूं लागली. तिनें राजाला

---

३५ Beal's Si-yu-ki. vol. II pp. 91-3; et 246-7.

३६ मौर्यसम्राट् अशोक—साहित्य (बंगाली मासिकपुस्तक); अशोक अवदानांतही साधारणपणें अशीच हकीकत आढळते.

त्याचेविषयीं खोट्यानाट्या गोष्टी सांगून तक्षशिला येथील सुभेदारीच्या कामावर त्याला पाठवून दिलें. त्याला कांहीं दिवस लोटल्यावर तिनें हांसत हांसत एके दिवशीं राजाच्या जवळून त्याचें शिक्कामोर्तब मागून घेतलें. आणि तक्षशिला येथील एका अधिकाऱ्याला राजाच्या नांवानें हुकूम लिहून त्यावर राजाचें शिक्कामोर्तब केलें. राजपुत्र कुनाल याचे दोन्ही डोळे काढून त्याला तक्षशिला येथून हाकून द्यावें, असा मजकूर त्या आज्ञापत्रिकेंत लिहिला होता. इकडे कुनाल आपल्या सुस्वभावामुळें प्रजेस आणि हाताखालच्या अधिकाऱ्यांस अत्यंत प्रिय झाला होता. तेव्हां अशी ही विलक्षण राजाज्ञा पाहतांच त्यांना एकदम विलक्षण आश्चर्य वाटलें. राजाज्ञा होती तरी ती पाळण्यास त्यांचें धैर्य होईना आणि कुनालाचे असे हाल करण्यास त्यांचे हात धजतना. शेवटीं कुनाल यानें पित्राज्ञा शिरसावंद्य करून ती पार पाडण्यास जो कोणी तयार होईल, त्यास बक्षीस देऊं केलें. तरी कोणी चांगला माणूस पुढें येईना. अखेर बक्षीसाच्या लालचीनें एक चांडाल तें काम करण्यास सिद्ध झाला. सभोंवतीं प्रजाजन स्फुंदत स्फुंदत डोळे पुशीत आहेत, परंतु स्वतः कुनाल आपला डोळा काढण्याविषयीं त्या चांडालाला मोठ्या गंभीरतेनें हुकूम देत आहे, असा तो तेव्हांचा देखावा अति हृदयद्रावक होता. एक डोळा काढला तेव्हां तो हातीं घेऊन आणि लोकांकडे वळून कुनाल त्याला ह्मणाला--' अरे हतभाग्य मांसपिंडा, जो तूं या सुंदर मूर्ति येवढा वेळ पाहत होतास, त्या तुला या पुनः दिसतील काय? तुला मी ' माझा माझा ' ह्मणून समजत होतों; परंतु हाय! हाय! ती माझी केवढी चूक होती! ' इतक्यांत दुसराही डोळा काढला तेव्हां कुनाल ह्मणाला—' सगळें पाप डोळ्यांकडून घडत असतें. तेव्हां ते गेल्याबद्दल आनंदच मानला पाहिजे. चर्मचक्षू जाऊन त्यांचेबद्दल ज्ञानचक्षू आले हा काय सामान्य लाभ ह्मणावयाचा? राजानें माझा त्याग केला खरा; परंतु धर्मराजानें मला पुत्र ह्मणून पोटाशीं धरलें आहे. या कष्टमय राज्यांतल्या उंच पदवीपासून मी भ्रष्ट झालों खरा; परंतु आनंदमय अशा धर्मराज्यांत माझा प्रवेश झाला आहे. '

तिष्यरक्षितेचें कपट.

नंतर तो आपल्या स्त्रीसहवर्तमान दारोदार भिक्षा मागत पाटिलपुत्रास येण्यास निघाला, आणि वीणा वाजवीत वाजवीत व तोंडानें भक्तिपर पदें ह्मणत ह्मणत तो आपल्या बापाच्या राजधानींत राजवाड्याच्या अगदीं जवळ येऊन पोहोंचला. राजानें तो वीणानाद आणि संगीत ध्वनि ऐकून त्याला आंत बोलाविलें. परंतु हा आपला पुत्र कुनाल आहे असें त्यानें ओळखिलें नाहीं. तूं कोण, कोठून, कशासाठीं आलास वगैरे विचारतां त्यानें झालेली हकीकत निवेदित केली. तेव्हां राजाच्या अंगाचा संताप होऊन त्यानें तिष्यरक्षिता राणीचा एकदम वध करण्याची आज्ञा दिली. ती ऐकून कुनाल साष्टांग नमस्कार घालून ह्मणाला. " महाराज, स्त्रीवध करणें हें कधीं न्याय्य होणार नाहीं. स्त्रीहत्या हें महत्पाप गणिलें आहे. अपराध्यावर दया करण्यासारखें दुसरें औदार्य नाहीं, असें तथागत धैर्य याचें वचन आहे. " पुनः पित्याच्या पायावर डोकें ठेवून कुनाल ह्मणाला—" महाराज, डोळे गेल्याबद्दल माझ्या मनाला यत्किंचित्ही वाईट वाटत नाहीं, किंवा मला त्यापासून यातनाही भोगाव्या लागत नाहींत. तेव्हां कृपाकरून मातुश्रीवर माझ्याकरितां राग काढूं नका. हें भोगणें माझ्या प्राक्तनीं होतें. हा माझ्या प्राक्तनाचा गुण आहे. मागल्या जन्मीं कांहीं पाप केलें असेल त्याचें प्रायश्चित्त या जन्मीं भोगावें लागलें. महाराज, मी सत्य बोलतों. आपला माझ्या वचनावर विश्वास बसत नसेल, तर हे डोळ्यांनो, तुह्मी पूर्ववत् व्हा. " असें ह्मटल्या बरोबर डोळे पूर्ववत आले.

---

३७ Burnouf's introduction P. 403 et seq. मौर्यसम्राट् अशोक पु. ९ अंक १२ वा. " Buddhist potery has nowhere glorified in more beautiful fashion, forgiveness and the love of enemies than in the narrative of Kunal " [ Oldenberg's Buddha P. 294. ] सेनप्रणीत अशोक चरित्र पृ० ७७. धर्माविषयींची आस्था आणि सद्धर्मप्रसाराविषयीं कळकळ या दोन बाबतींत अशोक याची प्रसिद्ध ख्रिस्ती बादशहा कॉन्स्टंटाईन याच्याशीं तुलना करीत असतात. परंतु नुसत्या धर्माच्याच बाबतींत नव्हे तर गृहसंबंधीं सुखदुःखांतही या दोघांमध्यें सादृश्य होतें, असें जनरल कनिंगहॅम ह्मणतात. तिष्यरक्षितेप्रमाणें कॉन्स्टंटाईनच्याही राणीची आपल्या सापत्न पुत्रावर पापदृष्टि गेली होती. परंतु अशोकाची पुण्याई जबर ह्मणून नुसत्या दृष्टीपलीकडे अधिक पापाचरण तिष्यरक्षितेकडून घडलें नाहीं. रोमन बादशहा मात्र येवढा भाग्यवान् नव्हता. ( Bhilsa Topes P. 124. )

हा प्रकार पाहून अशोकाचा भाऊ वीताशोक यालाही उपरति झाली व तो आचार्य उपगुप्त याच्या मठांत जाऊन राहिला.

**वीताशोक.** पुढें गुणाकर नांवाच्या यतीपासून त्यानें दीक्षा घेतली. या वेळीं **निर्ग्रंथ** नांवाचा एक निराळाच धर्मपंथ होता. त्यांतल्या एकानें बौद्ध धर्माची निंदा आरंभिली होती. आपण उंच आसनावर अधिष्ठित झालों आहों आणि बुद्ध आपल्या चरणापाशीं लोळत आहे, असें चित्र काढून त्याचा प्रसार त्यानें पंडुवर्धन प्रांतांत केला होता. त्यावरून अशोकाला त्वेष येऊन त्यानें त्याला धरून आणण्यासाठीं बक्षिस लाविलें होतें. तेव्हां एका अभीरानें बक्षीसाच्या लालचीनें वीताशोकासच तो निर्ग्रंथी समजून त्याचें डोकें का[?]न आणून राजाला नजर केलें. तें पाहून अशोकाला मनस्वी दुःख झालें. त्याच्या जिवाला तळमळ लागली. शेवटीं उपगुप्तानें धर्मोपदेश करून त्याचें मन स्वस्थ केलें, अशी एक कथा अशोक अवदानांत सांगितली आहे.

---

## प्रकरण ७.

### धर्मकृत्यें.

बौद्ध धर्माच्या अभिवृद्ध्यर्थ अशोकानें जे प्रयत्न केले त्यांत एक गोष्ट मोठी महत्वाची आहे, ती ही कीं, त्यानें देशो-

**तीर्थांचें दर्शन.** देशीं हिंडून बौद्धतीर्थस्थानांचें दर्शन घेतलें, आणि त्या त्या ठिकाणीं नवीन स्तूप उभारले, अथवा जुन्यांचा उद्धार केला. निग्लीव[३८] व पडेरिआ[३९] येथील स्तंभलेखावरून ही गोष्ट प्रत्ययास येते. स्वतःच्या राज्यांत तर त्यानें ८४,००० स्तूप निर्माण केले अशी दंतकथा आहे.[४०] अशोकानें उभारलेले स्तंभ व भव्य

---

३८ निग्लीव ( Epigraphica Indica vol. v pp. 5-6. )

३९ पडेरिया ( Epigraphica Indica vol. I p. 4. )

४० Beal's si-yu-ki vol. ii p. 89-90 ; Legge's Translation of Fa-Hien's Record p. 69.

मंडप अजून कित्येक ठिकाणीं प्रत्यक्ष पाहण्यास सांपडतात. बुद्धगया येथील बोधिवृक्ष व वज्रासन यांच्या भोवतीं कठडा व त्याच्या रक्षणार्थ चारी बाजूला मोठाले तट अशोकानें बांधले होते असें सांगतात. त्यांपैकीं कठडा मात्र मोडक्या तोडक्या स्थितींत अद्याप पाहण्यास साप-डतो असें ह्मणतात[४१]. याशिवाय बौद्ध भिक्षू व भिक्षुणी यांना राहण्या-साठीं धर्मशाळा तर त्यानें किती बांधिल्या त्यांची गणति करितां येत नाहीं.

अशोकानें ज्या ज्या स्थलांचीं दर्शनें घेतलीं, त्यांतल्या प्रमुख स्थानांचीं नांवें येथें देतों. ज्या ठिकाणीं बुद्धाचा जन्म झाला, ते लुंबिनी नांवाचें उद्यान; बुद्धाच्या बापाची राजधानी कपिलवस्तु नगरी; संसारा-विषयीं विरक्ति उत्पन्न होऊन राजवाड्यांतून अंधाऱ्या रात्रीं बाहेर पड-ल्यावर गांवाबाहेर ज्या ठिकाणीं बुद्धानें आपल्या अंगावरचे अलंकार व राजभूषणें बरोबर आलेल्या सेवकास देऊन टाकिलीं, आणि तरवारीनें आपले केस कापून, वैराग्यचिन्ह धारण केलें तें अनोमा नांवाच्या नदीचें तीर; ज्या ठिकाणीं बुद्धाचा समकालीन राजा बिंबिसार राज्य करीत होता, आणि ज्या ठिकाणीं पर्वत आणि गुहा यांच्यामध्यें एकांतांत तपश्चर्या करणाऱ्या ऋषीपाशीं जाऊन बुद्धानें आश्रय मागितला, ती राजगृह नामक राजधानी व तिच्या आसपासचे पर्वत व ऋषींनीं शिकविलेल्या जपतप साधनांनीं तृप्ति न झाल्यामुळें, तेथून निघाल्यानंतर ज्या ठिकाणीं त्यानें जाऊन सहा वर्षे सारखें चिंतन केलें, तें बुद्धगयाजवळचें उरुवेल नांवाचें जंगल; तपश्चर्या व्यर्थ आणि अनर्थावह समजून तिचा नाद सोडून दिल्यावर क्षीण झालेल्या शरीरास यथेष्ट आहार देऊन ज्या ठिकाणीं त्यानें पुनः टवटवी आणली, आणि ज्या ठिकाणीं सुजाता नामक स्त्रीनें त्याला यथेच्छ भोजन घातलें तें निरंजना नदीचें तीर; ज्या ठिकाणीं अश्वत्थ वृक्षाच्याखालीं बसला असतां त्याला सिद्धि प्राप्त झाली, ती बुद्धगया; सिद्धि प्राप्त झाल्यानंतर ज्या ठिकाणीं त्यानें प्रथम धर्मोपदेशास

४१ Dr. Rajendra Lal Mitra's Bodh-Gaya pp. 71, 72, 146.

प्रारंभ केला, तें काशी येथील मृगदावकानननामक स्थान; आणि अखेर ज्याठिकाणीं त्या महात्म्यानें या लोकींचें आपलें कर्तव्य उत्तमप्रकारें पार पाडून अत्यंत समाधानानें इहलोकाचा निरोप घेऊन निर्वाणपदाप्रत गमन केलें असें तें कुशिनगर. ह्या सगळ्या स्थलांचें दर्शन घेऊन त्या त्या ठिकाणीं अशोकानें चैत्य, स्तूप, मंडप व विहार निर्माण केले, आणि त्या त्या ठिकाणीं भावी संततीच्या लोकांना धर्मोपदेश करण्यासाठीं बुद्ध धर्माचीं मुख्य मुख्य तत्वें मनांत बिंबविणारीं लहान लहान वाक्यें व सूत्रें शिलांवर, स्तंभांवर, किंवा विहार वगैरे इमारतींच्या भिंतीवर खोदून ठेविलीं. या लेखांचा उल्लेख पुढच्या प्रकरणांत करण्यांत येईल. याशिवाय रस्तोरस्तीं थकल्याभागलेल्या प्रवाशांना आणि जनावरांना विश्रांतीसाठीं छाया व्हावी ह्मणून, रस्त्याच्या दोन्ही बाजूस उंबरांचीं व आंब्याचीं झाडें लावणें, दर अर्ध्या अर्ध्या कोसाच्या अंतरावर तृषार्तासाठीं विहीरी खोदणें व रात्रीं मुक्काम करण्यासाठीं धर्मशाळा बांधणें वगैरे अनेक धर्मकृत्यें अशोकानें करून ठेविलीं.[४२]

---

# प्रकरण ८.

## अशोकाचे लेख.

**अशोकाचे लेख व त्यांचे ऐतिहासिकदृष्ट्या महत्व.**

बौद्ध धर्माच्या इतिहासाचा बराचसा भाग केवळ दंतकथांच्या रूपानें हल्लीं उपलब्ध आहे. खरोखर ‘ इतिहास ’ असें नांव ज्याला देतां येईल, अशी विश्वसनीय माहिती या दंतकथांमधून निवणें शक्य नाहीं. तशी माहिती जी थोडी फार मिळते, ती अशोकानें कोरून ठेवलेले शिलालेख, स्तंभलेख आणि आदेश यांवरूनच मिळते. ह्मणून या लेखांचें महत्व इतिहासदृष्टया फार मोठें समजतात. किंबहुना हे लेख आहेत, ह्मणूनच बौद्ध धर्माची खरी योग्यता आपणांस हल्लीं कळते आहे, असेंही ह्मणतां येईल.

---

४२ दिल्ली येथील स्तंभावरील आठवा आदेश, पुढच्या प्रकरणांत दिला आहे तो पहा.

तेव्हां खऱ्या इतिहासाचे उगम जे हे शिलालेख त्यांच्यासंबंधानें जरा विस्तारानें लिहिलें असतां वावगें होणार नाहीं.

प्रियदर्शी.

अशोकाच्या वेळचे ह्मणजे दोन हजार वर्षांपूर्वीचे हे लेख आहेत. यापैकीं कांहीं खडकावर, कांहीं पाषाणस्तंभावर आणि कांहीं मोठमोठ्या दगडाच्या शिलांवर कोरलेले आहेत. यापैकीं खडकावर कोरलेले लेख सर्वांत आधीचे आणि फार मजेचे आहेत. प्रत्येक लेखांत अशोकाच्या राज्याभिषेकापासून कितव्या सालीं तो लेख लिहिला गेला तें स्पष्ट सांगितलें असल्यामुळें, त्यांच्या कालनिर्णयाची भानगड बिलकुल राहिली नाहीं. अशोकाचे जे प्रसिद्ध १४ आदेश खडकावर कोरलेले आहेत, त्यांपैकीं बहुतेक त्याच्या राज्याभिषेकापासून तेराव्या किंवा चौदाव्या सालांतले आहेत. पाषाणस्तंभावरचे लेख सत्ताविसाव्या किंवा अठ्ठाविसाव्या वर्षांतले, आणि बैरात अथवा बाब्रा येथील लेख त्याहून अलीकडचे आहेत. हे सगळे अशोकानें कोरविले खरे; परंतु त्या लेखांत अशोकाचें नांव नाहीं. तर ' पियदसी ' अथवा ' देवानाम् पिय पियदसी ' ( प्रियदर्शी अथवा देवानाम् प्रिय प्रियदर्शी ) राजा असें नांव त्यांत आढळतें. हा प्रियदर्शी राजा कोण असावा असा प्रथम मोठा प्रश्न येऊन पडला होता. या प्रश्नाचा उलगडा कसा झाला त्याची हकीकत मोठी गमतीची आहे. चार्लस टर्नर नांवाच्या एका मोठ्या सरकारी कामदारानें सिंहली पंडितांच्या साहाय्यानें पालीभाषेचा अभ्यास करून सिंहलद्वीपांतले महावंश आणि दीपवंश ह्या दोन सुप्रसिद्ध बौद्धधर्म ग्रंथांचा परिचय करून घेतला. त्यांत अशोक हा त्या धर्माचा मोठा पुरस्कर्ता होऊन गेला, व त्यानें कित्येक शिलालेख लिहून ठेविले आहेत, असा उल्लेख आला. इतकेंच नाहीं, तर त्याचा काळ वगैरे सर्व हकीकत यथातथ्य दिलेली आढळली. त्यावरून टर्नर साहेबांनीं बौद्धधर्माचा संगतवार इतिहास प्रथम लिहिला.

**प्रिन्सेप साहेबांचे दीर्घ प्रयत्न**

इकडे मि० जेम्स प्रिंसेप साहेबांनीं सन १८३७।३८ सालीं निरराळ्या ठिकाणचे शिलालेख व नाणीं जमा केलीं, आणि त्यांतलीं अक्षरें परस्परांशीं ताडून पाहिलीं. हे लेख बहुतेक बौद्ध मंदिरांत सांपडले होते. त्यांवरून मंदिराची स्थापना कोणी केव्हां केली वगैरे हकीगतीचें हें दानपत्र असेल असें साहजिकपणें त्यांस वाटलें, आणि त्यांचीं अक्षरें ताडून पाहतां शेवटलीं दोन अक्षरें जुळलीं. तेव्हां हीं शेवटलीं दोन अक्षरें ' दान ' हीं असतील अशीं त्यांनीं निवळ कल्पना केली. मग जेथें जेथें हीं अक्षरें येत गेलीं, तेथें तेथें तीं ' दान ' अशींच वाचण्याचा त्यांनीं क्रम ठेविला. देवनागरी, नागरी वगैरे भाषेंत ' दा ' जसा काढतात, त्याच्या सारखाच जवळ जवळ येथेंही काढिलेला होता. तेव्हां तो ' दा ' च आहे, अशी खात्री झाली. याप्रमाणें एकेक अक्षर दुसऱ्या लेखांतील व दुसऱ्या भाषेंतील अक्षराशीं जुळवून पाहतां पाहतां अखेर कोडें उमगलें. निबिड अंधकारामध्यें जसा एखादा सूर्याचा किरण एकाएकीं येऊन पडावा तसा येथें प्रकार झाला. सिंहलद्वीपांतल्या बौद्ध धर्म ग्रंथाच्या पाली भाषेचें व या लेखाच्या भाषेंत बरेंच सादृश्य दिसूं लागतें. संस्कृतातल्या विभक्तीचे प्रत्ययही स्पष्टपणें नजरेस पडूं लागले. तेव्हां अर्थबोध होण्यास मोठीशी अडचण पडली नाहीं. याप्रमाणें भाषातुलनाशास्त्राच्या पद्धतीनें एके काळीं तुच्छ वाटलेल्या गोष्टीचें महत्व लोकांना कळूं लागलें.

दिल्ली येथील फेरोजशहाच्या स्तंभावरचा लेख व दुसरे कित्येक लेख व त्यांचीं इंग्रजींत झालेलीं भाषांतरें मि० प्रिन्सेप यांनीं बंगालच्या एशियाटिक सोसायटीच्या सभासदांस दाखविलीं, व तीं छापून प्रसिद्ध केलीं. ही हकीगत वाचतांच मि० टर्नर यांना वाटलें कीं, हे लेख महावंशांत उल्लेखिलेला जो अशोक त्याचेच असावेत. राज्याचा अफाट विस्तार, मगध देशाचा उल्लेख, आणि भूतदया दाखविण्यासंबंधाच्या आज्ञा इत्यादि गोष्टी ज्याप्रमाणें महावंशांत अशोकाविषयीं सांगितल्या होत्या, तशाच त्या प्रियदर्शी राजाच्या या लेखांतही हुबेहुब आढळल्या;

पुढें अशोकाचे समकालीन अशा टॉलेमी, मेगाज, वगैरे कित्येक ग्रीक राजांचीं हीं नांवें सदरहू लेखांत सांपडली; आणखी अशोकाचा आजा चंद्रगुप्त याच्याही नांवाचा उल्लेख त्यांत केलेला होता. तेव्हां तर प्रियदर्शी आणि अशोक हे एकच या विषयीं तिळमात्र संशय उरला नाहीं. प्रियदर्शी ह्मणजे आनंद पाहणारा आणि अशोक ह्मणजे दुःखहीन या दोन्हीं अर्थांतही पुष्कळ साम्य आहे हें आणखी ज्यास्त पुष्टीकरण झालें. अजूनही ज्या कोणाला या गोष्टीविषयीं शंका राहिली होती, त्यांची ती शंका दीपवंशानें निवारण केली. ज्या राजाला महावंशांत अशोक ह्मटलें आहे, त्यालाच दीपवंशांत प्रियदर्शी ह्मटलें आहे, हें जेव्हां कळलें तेव्हां तर सगळाच वाद मिटला.

**खडकावरील लेख.**

खडकावरच्या लेखांचे दोन वर्ग पाडतां येतात—एक आधीच्या काळचे व दुसरे मागाहूनचे. पहिल्या वर्गांत पांच लेख येतात.

१ गुजराथेंत जुनागडाजवळ गिरनार येथें—याची उंची १७ फूट व पायथ्यापासली रुंदी ८ फूट आहे. या लेखाचें प्रत्येक अक्षर १ १/५ इंच उंच आहे. या खडकाचा कांहीं भाग जवळपास पूल बांधण्यासाठीं सुरुंग लावून नेला. त्यांत अशोकाच्या १३ व्या आदेशाचा कांहीं भाग गेला. पुढें कित्येक वर्षांनीं कॅप्टन पॉस्टन हे या पुलाजवळची जमीन खोदीत असतां त्यांना या आदेशाचा कांहीं भाग कोरलेले दगड छिन्नविच्छिन्न अशा स्थितींत सांपडले.*

२ ओरिसा प्रांतांत धौली येथें—हा वरच्या सारखाच आहे.

३ त्याच प्रांतांत जौगड येथें—हा तीन निरनिराळ्या शिलाखंडांवर कोरलेला आहे. पहिल्या दोन खंडांत प्रत्येकीं पांच पांच मिळून दहा आदेश आहेत व तिसऱ्यांत धौली येथल्यासारखे दोन नवे आदेश आहेत.

४ यमुनेच्या उत्तर तीरावर मसूरीच्या जवळ खालसी येथें—येथील खडक १० फूट लांब, १० फूट उंच आणि ८ फूट जाड आहे.

---

* Cunningham's Corpus Inscriptionum Indicarum vol. i. p. 14.

५ वायव्येकडे अटकेपासून कांहीं अंतरावर कर्पूदगिरीपाशीं शाहाबाजगडी येथें—ज्या खडकावर हा लेख कोरला आहे त्याची उंची १० फूट व लांबी २४ फूट व जाडी १० फूट आहे. यांत कित्येक ग्रीक राजांच्या नांवांचा उल्लेख असल्यामुळें हा लेख इतिहासदृष्ट्या फार महत्वाचा आहे. याची भाषा Ariano Pali ही आहे.

या ठिकाणीं एकेकच लेख आहे असें नाहीं. अनेक आहेत. ते सर्व मिळून अशोकाचे प्रसिद्ध चौदा आदेश होतात. या आदेशांचें भाषांतर पुढच्या प्रकरणांत दिलें आहे तें पाहावें. अशोकाच्या राज्याभिषेकापासून ११ व्या व १४ व्या वर्षाच्या दरम्यान ह्मणजे तीन वर्षांत हे चौदा आदेश कोरण्यांत आले असें कांहीं पंडितांचें ह्मणणें [43] आहे.

या चौदा आदेशाशिवाय आणखी दोन आदेश धौली आणि जौगड येथें सांपडले. या लेखांची भाषासरणी व लिहिण्याचा झोक पहिल्या चौदा आदेशाहून निराळा आहे. या शिवाय आणखी दोन रूपनाथ आणि सहसराम येथें सांपडले. यांपैकीं एक तर सर्वांत जुना आहे.

हे लेख खडकावर कोरलेले आहेत ह्मणून वर सांगितलेंच आहे. परंतु येवढे मोठे खडक ठिकठिकाणीं मिळण्याची पंचाईत पडूं लागली, तेव्हां शिलास्तंभ तयार करून ते उभारण्याची कल्पना अशोकाला सुचली. अलाहाबाद, दिल्ली, वगैरे ठिकाणीं असें स्तंभ आहेत. या स्तंभावर आठ आदेश कोरलेले आहेत. या दोन स्थलाची त्रोटक माहिती येणेंप्रमाणें आहे:– १ दिल्ली–येथील स्तंभाला फिरोजशहाची लाट ह्मणतात; हा मूळ यमुनेच्या कांठीं खिजराबाद येथें होता. तो तेथून फिरोजशहानें दिल्लीस नेला, असें सांगतात. याची एकंदर उंची ३२ गज होती. पैकीं ८ गज जमिनीखालीं होता असें शमसी शिराज ह्मणून एका फारशी ग्रंथकारानें लिहिलें आहे. हल्लीं त्याची उंची ४२॥ फूट आहे असें जनरल कनिंगह्याम लिहितात. या स्तंभाच्या चारी बाजूंवर लेख कोरलेले आहेत. या शिवाय दुसराही एक स्तंभ तेथें आहे.

---

43 Copleston's Buddhism.

२ अलाहाबाद—हा ३९ फूट उंच असून याचा पायापासला व्यास ३ फूट व शिखरापासला २ फूट २ इंच आहे.*

हे लेख कोरण्यांत अशोकाचा काय हेतु असेल तो निश्चित करणें कठीण आहे असें नाहीं. धर्मोपदेशकांच्या द्वारें होणारें काम तेवढ्या वेळेपुरतें असतें, चिरकाल टिकणारें नसतें, हें जाणून भावी संततीच्या कल्याणासाठीं ही तजवीज करून ठेवण्यांत अशोकानें फार दूरदर्शित्व दाखविलें यांत शंका नाहीं. आज दोन हजार वर्षांनंतर खुद्द अशोकाचें देखील नांव लोकांच्या स्मरणांतून गेल्यासारखें झालें आहे; तथापि त्यानें कोरून ठेविलेल्या लेखांपैकीं पुष्कळ लेख वादळें, पर्जन्य, विद्युत, वगैरे नैसर्गिक संकटें आणि सिथियन, इराणी, तुराणी, मोगलआदिकरून म्लेंच्छ लोकांच्या स्वाऱ्या इत्यादि मानवी संकटांमधून धैर्यानें टिकाव धरून लोकांना धर्मोपदेश करण्याच्या कामांत रतिभर हयगय न करणाऱ्या कर्तव्यतत्पर पुरुषाप्रमाणें अहोरात्र उभे आहेत. या लेखांसाठीं त्यानें जीं स्थळें निवडून काढिलीं त्यांतही एक खुबी आहे; पण पूर्वींच्या आणि आतांच्या काळांत हिंदुस्थानांतल्या देशमर्यादा व शहरांची स्थिति यांत विलक्षण क्रांति घडून आल्यामुळें, ती खुबी वरवर पाहणारांचे लक्षांत कधीं न येण्यासारखी आहे. अशोकाची राजधानी पाटलीपुत्र हें नगर होतें ह्मणून वर सांगितलें आहे. या शहराची गंधवार्ताही अर्वाचीन भूगोलाला नाहीं. तथापि मेगास्थनीस आणि चिनी प्रवासी यांनीं लिहून ठेवलेल्या प्रवासवर्णनावरून असें दिसतें [४४] कीं, हल्लीं ज्याला पाटणा ह्मणतात त्याच्या जवळपास कोठें तरी हें पाटलीपुत्र असावें. बहुतकरून हें स्थान गंगेच्या पात्रांत बुडालें असावें. कारण पाटलीपुत्रनगर जलप्रलय होऊन नष्ट झालें, अशी दंतकथा आहे. आणि

---

* Corpus Inscriptionum Indicarum vol. i. pp. 34—38.

४४ Legge's Translation of Fa-hien's record of Buddhistic Kingdoms या ग्रंथांत पाटलीपुत्राचे अक्षांश २५° २८' पू० आणि रेखांश ८५° १५' पू० असें दिले आहेत. [ पृ० ३१ टीप ५ ]

नद्यांचे ओघ कालपरत्वें फिरतात ही गोष्टही सुप्रसिद्ध आहे. पाटलीपुत्राच्या भोवतीं अशोकानें भिक्षूंच्यासाठीं अनेक विहार बांधले होते, त्यांचें अल्प चिन्ह अद्यापिही गंगेच्या तीरावर दिसत आहे. शिवाय पाटणा शहर ज्या प्रांतांत आहे त्या प्रांतालाही 'बहार' अथवा 'बिहार' ह्मणतात. असो; अशोकाच्या ज्या राज्यमर्यादा चरित्राच्या प्रारंभीं दिल्या आहेत त्या पाहिल्या ह्मणजे त्याची राजधानी पाटलीपुत्र नगरी ही त्याच्या राज्याच्या जवळ जवळ मध्यमागीं होती असें ह्मणतां येईल. या राजधानीपासून चार दिशेला चार मोठाले रस्ते जात होते. एक नेपाळाकडे जाणारा; दुसरा गयेवरून छोटा नागपूर प्रांतातल्या डोंगरांच्या रांगेमधून निघून ओढियापर्यंत जाणारा; तिसरा प्रयाग, उज्जनीवरून काठेवाडाकडे जाणारा; आणि चौथा पंजाब, कंदाहाराकडे गेलेला; या चारी मार्गानें प्रवाशांच्या झुंडीच्या झुंडी नेहमीं जात येत असत. तेव्हां या रस्त्यांवर स्तंभ उभारले असतां पुष्कळांच्या वाचण्यांत त्यांचा मजकूर येईल असें जाणून मुद्दाम चांगल्या कुशल कारागिरांकडून लेख कोरवून सदरहू स्तंभ या चारी रस्त्यांवर स्थापण्यांत आले. या स्तंभावरचें शिल्प कामही अचंबा वाटण्यासारखें उत्तम आहे असें तत्कलाभिज्ञ लोक सांगतात.

या स्तंभावर लिहिलेले आदेश आणि वर सांगितलेले खडकावर कोरलेले आदेश यांच्यामध्यें पुष्कळ साम्य आहे. ह्मणून स्तंभावरील आदेशांचें सविस्तर भाषांतर न देतां त्यांतील मजकुराचा फक्त सारांश येथें देतों. त्यावरून सदरहू लेखांचें पूर्ण स्वरूप वाचकांच्या ध्यानांत येईल.

## दिल्ली येथील स्तंभ.

### उत्तरेकडील बाजू.

#### १ आदेश.

"देवांचा प्रिय पियदशी राजा ह्मणतो:— माझ्या राज्याभिषेक कालापासून २७ व्या वर्षी मी हा लेख कोरीत आहे..... .... धर्मा-

विषयीं लालसा आणि श्रद्धा हीं आपोआप वाढत जातील. माझ्या राज्यांतले सगळे गृहस्थ आणि यती वगैरे यांच्यामध्यें धर्माचें बंधन आहे, आणि ते धर्ममार्गानें सदोदित चालतील. विशेष गोष्ट ही कीं, आपल्या मनोविकारांचे दमन करून ते महत्तम ज्ञान संपादितील. कारण खरें ज्ञान तें हेंच आहे. ज्ञानाचा जनक धर्म, आश्रयदाता धर्मच, आणि गुरूही धर्मच. खऱ्या सुखाचें धाम धर्म हेंच आहे. "[४५]

२.

"धर्म हाच जगांत श्रेष्ठ आहे, आणि धर्म ह्मणजे सत्कृत्यें करणें आणि असत्कृत्यापासून पराङ्मुख राहणें. दया, औदार्य, अंतःकरणाची शुद्धता आणि पवित्र आचरण ह्या गोष्टी धर्मसंस्काराच्या मुळाशीं आहेत. गरीब, दुःखी कष्टी माणसें, पशुपक्षी आणि जलचर व स्थलचर प्राणी, यांच्यासाठीं अनेक धर्मकृत्यें मीं केलीं आहेत, तशींच सर्वांनीं करावीं. असें जो कोणी करील त्याला शाश्वत सुखाची प्राप्ति होईल."

३

"जें मला चांगलें आणि धार्मिक दिसतें, त्याची प्रवृत्ति वाईटाकडे असली तरी मी त्याला पापांत गणीत नाहीं. चांगलें वाईट ओळखण्यासाठींच मनुष्याला डोळे दिलेले आहेत. आपापल्या दृष्टीप्रमाणें ज्यानें त्यानें चांगले वाईट ओळखावें. पुढें सांगितलेल्या गोष्टींची क्षुल्लक पापांत गणना केली आहे— अपकार, निष्ठुरता, राग, गर्व, हेवा ...."

४ पश्चिमेकडची बाजू.

".... .... राज्याभिषेक कालापासून २७ व्या वर्षी हा लेख कोरीत आहे. आज लक्षावधि लोक माझे भक्त बनले आहेत. त्यांच्या हातून घडणाऱ्या अपराधांबद्दल त्यांना किती दंड व शिक्षा द्यावयाची तें आतां सांगतों .... .... ....ज्या ज्या ठिकाणीं माझे भक्त औदुंबराला प्रदक्षिणा

---

४५. हें भाषांतर अक्षरशः व पूर्णपणें केलेलें नाहीं. मतलब कळण्याकरतां महत्वाचा भाग तेवढाच येथें दिलेला आहे.

चालतील, त्या त्या ठिकाणच्या लोकांनीं त्यांना खाण्यापिण्याचे जिन्नस पुरवावे, यांत त्यांचें हित आहे. जो कोणी माझा भक्त चुकेल त्याला त्याच्या अपराधाच्या मानानें शिक्षा होईल; पण कोणालाही देहांत शासन मिळणार नाहीं. तुरुंगवास व फांशीं यांच्या ऐवजीं हद्दीपार करण्याची शिक्षा ठरविण्यांत आली आहे. भर रस्त्यावर खून करणारे [ दरवडेखोर? ] मग ते गरीब असोत किंवा श्रीमंत असोत, कोणीही मी ठरविलेल्या तीन विशेष दिवसांत फांशीं दिलें जाणार नाहींत. जे कोणी सजीव प्राण्यांना जखम करतील किंवा ठार मारतील त्यांच्यावर कृपाळू होऊन त्यांचे हातपाय तोडण्याच्या ऐवजीं त्यांना उपाशीं ठेवण्यांत येईल. सारांश अपराध्यांवर सुद्धां माझी कृपादृष्टी राहील. ”

### ५ दक्षिणेकडची बाजू.

“ .... .... .... पुढें सांगितलेल्या प्राण्यांचा वध करूं नये. पोपट, मैना, जंगली बदक, बगळे, घुबड, गिधाड, पाकोळी, अंबक पिल्लिक (?), कावळा, वेदवेयक, (?), शंकूजमव (?), कफतसयक (?) .... .... खबूतर. चतुष्पाद जनावरांत खालीं दिलेले खाऊं नयेत. बकरीं, मेंढी, डुकरी. पशु व पक्षी यांना मांसासाठीं अगर चैनीसाठीं मारूं नये किंवा त्यांचे हाल करूं नये. .... .... प्रत्येक महिन्याच्या चतुर्दशीस व पौर्णिमेस (अगर अमावास्येस ) बैलांस चरण्यास सोडूं नये..... ....

### ६ पूर्वेकडची बाजू.

“ ....... माझ्या कारकीर्दीच्या बाराव्या वर्षीं लोकांच्या हितार्थ एक आदेश मी जाहीर केला होता. तो आतां रद्द करून आणि माझा पूर्वींचा धर्म पापमूलक होता हें सांगून, धर्माचे बाबतींत ज्यांचीं मतें माझ्या पासून निराळीं आहेत त्यांच्यासाठीं मी प्रार्थना करितों. आणि तेही लवकरच माझ्या पंथाला येऊन मिळतील व शाश्वत सुख मिळवितील अशी आशा करितों. ह्मणून हा आदेश जाहीर करण्यांत येत आहे. ”

७

"........मागचे राजे अशीच इच्छा करतां करतां मेले. राज्यकर्त्यांनीं धर्मांतर करण्याच्या योगानें धर्माचा उत्कर्ष कसा होतो? हलक्या प्रतीच्या लोकांनीं धर्मांतर केलें असतां जर खऱ्या धर्माची वृद्धि होते, तर राज्यपदस्थ थोर कुळांतल्या माणसांनीं एखाद्या धर्माचा स्वीकार केल्यावर त्यांचा उत्कर्ष किती होईल? आजपासून धर्मोपदेश करण्यासाठीं उपदेशक पाठविणें वगैरे गोष्टी मीं केल्या आहेत हें जाहीर व्हावें."

८

"........आणखी धर्माचा उत्कर्ष होत जाईल तसतसा त्याच्या विरुद्धपक्षालाही विशेष जोर येईल. यासाठीं लोकांना धर्मोपदेश व्हावा अशी योजना करण्यांत येत आहे. त्याच्यायोगानें लोकांना खरें ज्ञान होईल. तें त्यांनीं दुसऱ्यांस द्यावें आणि धर्मप्रसार करावा. त्यांच्या लक्षावधी शिष्यांनाही माझें तेंच सांगणें आहे; त्यांनींही लोकांना धर्मज्ञान करून द्यावें........

"रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या मनुष्यादि प्राण्यांना उन्हाचे वेळीं छायेची जागा व्हावी म्हणून रस्त्यानें उंबराचीं व आंब्याचीं झाडें मीं लाविलीं आहेत; व दर अर्ध्या कोसाच्या अंतरावर विहिरी व धर्मशाळा बांधल्या आहेत. सारांश प्रवासी लोकांच्या सोईसुखासाठीं मी जशी व्यवस्था केली आहे, तशीच इतरांनींही करावी.

"धर्मशास्त्रांत प्रवीण असतील अशा गुरूंनीं दान करण्यास समर्थ अशा श्रीमंत लोकांत, नास्तिकांच्या मंडळींत, गृहस्थांत, यतींत, ब्राह्मणांत, अगदीं दरिद्री लोकांतदेखील, सगळ्या ठिकाणीं, आपला प्रवेश करावा; माझ्या राणीवशांतदेखील युक्तीनें आणि अदबीनें त्यांनीं जावें, आणि सर्वांची सद्धर्माकडे प्रवृत्ति होईल अशा रीतीनें त्यांचें मन वळवावें. आणि धर्माचें खरें रहस्य म्हणून जें काय आहे तें हेंच कीं, धर्माच्या योगानें दया, औदार्य, सत्य, पवित्रता आणि प्रामाणिकपणा, इत्यादिकांचा जगांत उत्कर्ष व्हावा........मीं ज्या ज्या धार्मिक गोष्टी केल्या आहेत त्या त्या

कर्तव्य ह्मणून लोकांनींही कराव्या. आईबाप आणि गुरू यांची सेवा करणें, वृद्धांचे ठायीं आदर ठेवणें, ब्राह्मण, श्रामण, निराश्रित मुलें, दरिद्री, नोकर चाकर, आणि चारण, इत्यादिकांचे विषयीं दया बाळगणें, हेंच धर्माचें सार आहे. धर्माची वृद्धि, धार्मिक कृत्यें करणें आणि धर्मशील माणसांचा छल न होईल अशी तजवीज करणें, अशा दोन उपायांनीं होत असते. आणि हे दोन्ही उपाय मी करीत आहे. ते माझ्या पुत्रपौत्रापर्यंत टिकोत.

## अलाहाबाद येथील स्तंभ.

### १ राणीचा आदेश.

' देवांचा प्रिय याच्या आज्ञेनें सर्व प्रधानांना जाहीर करण्यांत येत आहे .... .... हीं आंब्याचीं झाडें दुसरी राणी[४६] हिनें आणि हीं किछिगनीया तिसऱ्या राणीनें दिलीं आहेत .... ....

## सांची येथील स्तंभ.

या स्तंभाचा पुष्कळसा भाग पडल्यामुळें लेख स्पष्ट होत नाहीं. तथापि तिसऱ्या ओळीपासून पुढें जो मजकूर वाचतां येतो, त्यांत असें एक वाक्य आहे कीं, ' क्षुधित अशा धर्मगुरूसाठीं एका उदार धार्मिक गृहस्थानें कांहीं तजवीज करून ठेविली आहे. ' आणि शेवटच्या दोन ओळींत ह्मटलें आहे कीं, ' माझी अशीही इच्छा आहे कीं, तृषार्तांना पिण्यासाठीं कापूर लावून थंडगार केलेलें पाणी पिण्यास मिळावें. ही व्यवस्था चिरकाल टिको. '

या लेखाशिवाय बाराबर येथील गुहेंतल्या लेखासारखे इतर किरकोळ लेख पुष्कळ आहेत, आणि त्यांवरून अशोकाच्या चरित्रांतल्या पुष्कळ

४६ ही राणी असंधिमित्रा ही असावी. हिची बौद्धधर्मावर अत्यंत श्रद्धा होती व धर्मकृत्याकडे तिचें फार लक्ष होतें. धर्मोत्कर्ष करण्याचें कामीं ही पतीला फार साह्य करीत असे. Bhilsa Topes. p. 114 यांतही या राणीची अशीच स्तुति केली आहे.

गोष्टींवर प्रकाश पडण्याजोगा आहे. या लेखांपैकीं कांहीं थोड्यांचा उल्लेख येथें करितों:—

बैराट येथील लेखांत ह्मटलें आहे—" देवांनां प्रिय असा राजा प्रियदर्शी सांगतो कीं, मी अडीच वर्षेंपर्यंत उपासक होतों. तेव्हां धर्माविषयीं विशेष आस्था मीं दाखविली नव्हती. त्यानंतर गतवर्षी मीं संघाचें दर्शन घेतलें. तेव्हांपासून जंबुद्वीपांतल्या पूर्वीच्या देवांचें देवत्व लोक मानीनातसे झाले आहेत. धर्माविषयींच्या माझ्या आस्थेचें हें फळ आहे. नुसत्या सत्तेच्या जोरावर हें फळ प्राप्त होत नसतें. स्वर्ग कितीही दुष्प्राप्य असला तरी धर्माविषयीं आस्था बाळगल्यानें तो दुर्बळांनांसुद्धां प्राप्त होतो. यासाठींच [ या लेखाच्या द्वारें ] लोकांना सांगण्यांत येत आहे कीं, त्यांनीं सर्वांनीं, मग ते सबळ असोत किंवा दुर्बळ असोत [ श्रेष्ठ पदवीचे असोत अथवा हलक्या दर्जाचे असोत ] धर्माविषयीं आस्था बाळगावी; परदेशाच्या लोकांनांही धर्मोपदेश करावा, आणि अशी आस्था चिरकाल ठेवावी. ह्मणजे [ धार्मिक ] उन्नति मोठी आणि अमर्याद होऊन राहील ".

इतर किरकोळ लेख.

सहसराम येथील लेखांत ह्मटलें आहे—" उपदेशकांच्या द्वारेंच धर्माचा प्रसार होत असतो. ( ह्मणून ) दोनशें छपन्न ( २५६ ) धर्मोपदेशक पाठविण्यांत आले आहेत. गुहांतून आणि ज्या ठिकाणीं स्तंभ उभारले असतील त्या ठिकाणीं स्तंभांवरून हें खोदून ठेवा ".

---

४७ ही तिसरी राणी किछिगनी. ( ? ) हिच्याशीं आपल्या कारकीर्दीच्या ३४व्या वर्षीं राजानें विवाह केला, असें टर्नर साहेब लिहितात. या दोन राण्याशिवाय तिष्यरक्षिता आणि पद्मावली ( कुनालाची आई ) अशा आणखी राण्या होत्या. Burnouf : Introductional' Historic du Buddhism Indien 149, 403, 405; Corpus Inscriptionum Indicarum Vol. iii p. 141. ही टीप ४८व्या पानावरील १२ व्या ओळींतील तिसऱ्या शब्दावर आहे.

४८. सिद्धपूर येथील लेखांतही अगदीं असाच मजकूर आहे ( Epigraphica Indica vol. iii pp. 138-9 ).

४९. Indian Antiquary vol. XX. p. 165.

रूपनाथ येथें सांपडलेल्या लेखांतही अक्षरशः हाच मजकूर आहे. नेपाळांत पडीरा आणि निग्लीव या ठिकाणीं सांपडलेल्या अशोकाचा आदेश याविषयींची माहिती डा० बुल्हर साहेबांनीं Epigraphica Indica vol. V. या पुस्तकांत येणेंप्रमाणें दिलेली आढळते :—

हे आदेश डा० फूरर यांस अनुक्रमें दिसेंबर १८९६ व मार्च १८९५ या वर्षीं सांपडले. पडीरा आणि निग्लीव हीं दोन्हीं ठिकाणें नेपाळांत आहेत. हे आदेश शिलास्तंभावर होते. त्यांपैकीं पडीरा येथील स्तंभ जमिनींत तीन फूट गाडलेला परंतु अभंग अशा स्थितींत सांपडला आणि दुसरा मात्र कांहीं ठिकाणीं भंगलेला होता. या दुसऱ्यावरच्या आदेशाच्या तिसऱ्या ओळींतलीं पहिलीं पांच आणि चौथ्या ओळींतलीं पहिलीं सात अक्षरें गेलीं आहेत.

ख्रि० पू० तिसऱ्या शतकाच्या वेळच्या मागधी भाषेंत हे दोन्ही आदेश लिहिले असल्यामुळें खालसी, धौली, जौगड, वैराट, सहसराम इत्यादि ठिकाणच्या लेखांच्या भाषेशीं या आदेशाची भाषा बहुतेक जुळते.

## पडीरा येथील आदेश.

" देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा ज्याला राज्याभिषेक होऊन वीस वर्षें झालीं, तो स्वतः येथें आला आणि ' या ठिकाणीं बुद्धशाक्यमुनि जन्मला ' असें ह्मणून या जागीं हा शिलास्तंभ उभारण्याची त्यानें आज्ञा दिली. या लुंबिनी गांवांत बुद्धाचा अवतार झाला ह्मणून येथील कर माफ करण्यांत येऊन या गांवांत धन वाटण्यांत आलें. "

यावरून बुद्धाचें जन्मस्थान निश्चित करण्याचें कामीं या लेखाचा फार उपयोग आहे हें दिसून येईल.

## निग्लीव येथील आदेश.

" देवांचा प्रिय प्रियदर्शी याच्या राज्याभिषेकास १४ वर्षें झाल्यावर, बुद्ध कोनाकमन याच्या स्तूपाचा दुसऱ्यानदा त्यानें विस्तार केला, आणि राज्याभिषेकास वीस वर्षें लोटल्यावर त्यानें स्वतः येऊन पूजा अर्पण केली, आणि हा स्तंभ त्याच्या आज्ञेवरून उभारण्यांत आला. "

याही आदेशाचा बौद्धधर्माचा इतिहास लिहिण्याचे कामीं फार उपयोग होण्यासारखा आहे. अशोकानें आपल्या कारकीर्दीच्या पंधराव्या वर्षीं बुद्ध कोनाकमन याच्या स्तूपाचा **विस्तार** केला यावरून त्या राजाच्या पूर्वीं ह्मणजे ख्रि० श० पूर्वीं २९९ वर्षांच्या अगोदर सदर स्तूप अस्तित्वांत असला पाहिजे. आणि कोनाकमनबुद्ध हा गोतमबुद्धानंतर बऱ्याच कालानें झाला असल्यामुळें, अर्थात्च गोतमबुद्धाचा निर्वाणकाल कांहीं पंडित ठरवितात, त्याप्रमाणें ख्रि० श० पू० ३९० किंवा ३२९ या वर्षीं निश्चित करतां येत नाहीं. याच्यापूर्वीं आणखी सुमारें शंभर वर्षें ह्मणजे ख्रि० श० पू० ४७७ च्या सुमारास तो असावा असें दिसतें.

खुद्द अशोकाच्या चरित्राशीं या आदेशाचा जो संबंध आहे, तो एवढ्याच पुरता आहे कीं, या लेखावरून अशोक आपल्या कारकीर्दीच्या एकविसाव्या वर्षीं यात्रा करीत करीत लंबिनी, आणि कोनाकमन बुद्ध याच्या स्तूपापाशीं आला होता ; इतकेंच नाहीं, तर तो बुद्धाची निर्वाणभूमि, रामग्राम, कपिलवस्तु, ककुच्छंदाचा स्तूप, आणि श्रावस्ती नगरी वगैरे ठिकाणींही आला असावा असें जें दिव्यावदान नामक ग्रंथांत ह्मटलें आहे, तें बहुधा खरें असावें. दुसरी एक गोष्ट यावरून निष्पन्न होते ती ही कीं, अशोकाच्या आज्ञेवरून या ठिकाणीं स्तंभ उभारण्यांत आले आणि लंबिनी येथील लोकावरचे कर उठविले, यावरून अशोकाची राज्यमर्यादा त्याकाळीं नेपाळापर्यंत जाऊन पोंचली असली पाहिजे.

बौद्धशास्त्रग्रंथांचें संशोधन करण्यासाठीं अशोकानें महासभा भरविली होती. त्यासंबंधाचा एक लेख आहे. तो असा :— ' राजा **प्रियदर्शी मागधसंघाला** अभिवादन करून सभासदांचें आयुष्य व सुखवृद्धि चिंतितो. पूज्य महाराज, मी बुद्ध, धर्म, आणि संघ यांना [ तीन रत्नांना ] किती पूज्य मानतों तें आपणांस विदितच आहे. महाराज, बुद्ध देवानें जें जें ह्मणून ह्मटलें आहे, तें तें सगळें सुभाषितच आहे. ( ह्मणून ) होईल तितका दूरपर्यंत त्याचा प्रसार करण्याचा माझा हेतु आहे. तो पार पडल्यास सद्धर्म चिरस्थायी होईल. पूज्य महाराज, धर्मपरियात्रेंत ( धर्मग्रंथांत ) इतक्यांचाच समावेश होतो—**विनयसमुत्कर्ष, आर्यवसानि,**

अनागतभयानि, मुनिगाथा, मोनेयसूत्त, उपतिष्यप्रश्न व लाघूलोवाद. ......पूज्य महाराज, माझी इच्छा आहे कीं, पुष्कळ भिक्षु व भिक्षुणी यांनीं अविरत या धर्मग्रंथांचें श्रवण आणि चिंतन करावें, ह्मणजे उपासकही तसेंच करितील. याच उद्देशानें, माझा हेतु सर्वांस समजावा यासाठीं हा लेख लिहून ठेवण्यांत येत आहे. [५०]

या लेखासंबंधानें कांहीं गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. बौद्धशास्त्रग्रंथाचें संशोधन करण्यासाठीं जमलेल्या सभासदांस उद्देशून हा लेख लिहिला आहे हें वर सांगितलेंच आहे. त्या वेळेस बौद्धमताचे अठरा संप्रदाय झालेले होते आणि प्रत्येक संप्रदायाचीं मतें एकाच गोष्टीसंबंधानें भिन्न भिन्न प्रकारें पडावीं असा एकच घोंटाळा झाला होता. हा घोंटाळा मोडल्याखेरीज आणि धर्माला स्थिरता आल्याखेरीज त्याचा प्रसार व्हावा तसा होणार नाहीं, इतकेंच नाहीं, तर तो धर्म रसातळास जाईल, अशा विचारानेंच सदरहू महत्वाच्या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं सभा बोलावण्यांत आली होती. या सभेस अनेक संघ आले होते. संघ या शब्दाची बरोबर कल्पना 'पंथ' अथवा इंग्रजी 'चर्च' या शब्दानें होईल. कोणत्याही धर्मसंबंधीं विषयासंबंधानें सारखें मत धरणाऱ्यांची जी जूट तिला बौद्धग्रंथांत 'संघ' संज्ञा आहे. संघास चिकटून राहणें हें धार्मिक कृत्यांपैकीं एक महत्वाचें कृत्य मानलें जात असे. बुद्धावर श्रद्धा, धर्मशीलता आणि संघशक्ति या तिघांच्या जोरावर बुद्धधर्माचा येवढा प्रसार झाला होता. लहान लहान पुष्कळ संघ असण्यापेक्षां एकच मोठा संघ असण्यापासून धर्माला ज्यास्त बळकटी येईल. अशा विचारानें सर्व संघाचें एकीकरण करण्याचा अशोकानें या सभेच्या द्वारें प्रयत्न केला आणि तो बऱ्याच अंशीं सिद्धीस गेला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. बौद्धधर्माच्या अंगच्या विलक्षण शक्तीचें रहस्य या संघांत होतें, ही गोष्ट अशोकाच्या लक्षांत पूर्णपणें येऊन चुकली होती असें यावरून दिसतें.

धर्माची अभिवृद्धि कशानें होईल याविषयीं दिल्ली येथील स्तंभावर येणेंप्रमाणें लेख आहे—' देवांचा प्रिय जो प्रियदर्शी राजा त्यानें ह्मटलें

५०. Senart's paper; Indian Antiquary vol XX p. 165-8.

आहे—मनुष्य जातीमध्यें धर्माची उन्नति कशी होईल? ( तर ) हलक्या जातींतल्या लोकांमध्यें धर्मश्रद्धा उत्पन्न झाली असतां ती निश्चयानें होईल ' आणखी—' देवांचा प्रिय जो प्रियदर्शी त्यानें ह्मटलें आहे—राजवंशांतल्या माणसांना धर्मोपदेश केला असतां धर्माची उन्नति किती होईल? जर निर्धन लोकांना धार्मिक बनविण्यानें धर्माची उन्नति होते, तर वरिष्ठ प्रतीच्या लोकांना धार्मिक केल्यानें ती किती झाली पाहिजे हें सांगावयास नको.'

अशोकाच्या किरकोळ लेखांतून वर दिलेले वेंचे वाचून अशोकाचें मन यावेळीं किती उदात्त झालें होतें, याची कल्पना आमच्या वाचकांनां करतां येईल. ख्रिस्ती धर्माची निंदा करण्याचा माझा उद्देश नाहीं. तथापि नीच जातीच्या लोकांना धार्मिक बनविणें हें जें धर्मोपदेशकांच्या कर्तव्याचें मुख्य अंग, तें ख्रिस्तापूर्वी कित्येक शतकें होऊन गेलेल्या अशोक राजास पूर्णपणें अवगत होतें, आणि त्याच तत्त्वावर त्यानें बौद्ध धर्माचा प्रसार करण्याचें योजिलें होतें, हें या लेखांवरून दिसून येईल.

अशोक आणि ख्रिस्त दोघांचेंही या कल्पनेपुरतें साम्य आहे, आणि कदाचित् ती दोघांनाही स्वतंत्रपणें निरनिराळ्या काळीं सुचली असेल, असेंही संभवनीय आहे. तथापि एकापासून ती दुसऱ्यानें घेतली असें ह्मणण्याचा जर कोणाचा आग्रहच असेल, तर ती अशोकापासून ख्रिस्तानें उचलली हें त्या दोघांच्या कालानुक्रमावरून सहज सहज दाखवून देतां येईल.[५२] शिवाय आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

---

५१ दिल्ली स्तंभावरील सातवा आदेश.

५२ ही कल्पना अशोकाला ख्रिस्तीशकाच्या पूर्वी तीन शतकें सुचून त्यानें ती अमलांत आणल्याबद्दल जनरल कनिंगह्याम् यांनीं अशोकाची तारीफ करून ह्मटलें आहे.—" The proselytizing zeal of Asoka is more worthy of record as it anticipated by nearly three centuries one of the most characteristic institutions of the early Christian Church (Bhilsa Topes) p. 123.

ती ही कीं, धर्मोपदेश करून नीच लोकांना धार्मिक बनवा असें अशोकानें सांगितलें आहे. दुष्काळाचे वेळीं पोटास देऊन त्या भाकरीबरोबर धर्म दुष्काळपीडितांस चारा असा प्रकार त्यानें कोठें केला नाहीं. कारण भाकर पोटासाठीं, पण धर्म अंतःकरणासाठीं असतो, हें तत्व अलीकडील ख्रिस्तीउपदेशकांपेक्षां अशोकाला अनंतपटीनें अधिक समजत होतें, हें या लेखांवरून व्यक्त होतें.

---

# प्रकरण ९.

## अशोकाचे प्रसिद्ध चौदा आदेश.

अशोकाच्या सगळ्या लेखांत त्याचे खडकावरील आदेश फार महत्वाचे आहेत, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. ते लेख येणेंप्रमाणें आहेत :—[५३]

१

" राजा प्रियदर्शी (देवांचा प्रिय) याचा हा आदेश आहे— प्राण्यांची हिंसा ही अजीबात बंद करण्यांत आली आहे. आतां (मांसाहाराच्या) मेजवान्या व्हावयाच्या नाहींत; कारण त्यांत फार पाप घडतें असें राजा प्रियदर्शी यास वाटत आहे. प्रियदर्शी राजाच्या मुदपाक खान्यांत सत्कार्यासाठीं दररोज लक्षावधि प्राण्यांचा संहार होत असे; परंतु आतां सत्कार्यासाठींसुद्धां हिंसा होणार नाहीं असें राजानें ठरवून टाकिलें आहे ".

२

" देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा यानें जिंकलेल्या मुलुखांत आणि चोल, पांड्य, सत्यपुत्र, केरलपुत्र, ताम्रपर्णी, आंटिओकस नांवाच्या यवन राजाचा प्रांत, व इतर शेजारचीं राज्यें, यांना कळविण्यांत येत आहे कीं, मनुष्य व इतर प्राणी यांच्यासंबंधानें दोन वेगळ्या व्यवस्था प्रियदर्शी राजानें योजिल्या आहेत. मनुष्य व पशुपक्ष्यादि प्राणी

---

५३ मूळच्या लेखांचीं हीं अक्षरशः भाषांतरें नाहींत. मतलब कळण्यापुरता महत्वाचा भाग तेवढा येथें दिला आहे.

यांना उपयुक्त अशीं झाडें वनस्पति वगैरे जेथें होत नसतील, तेथें त्यांच्यासाठीं तीं इतर ठिकाणाहून आणवून लाविलीं आहेत, विहिरी खोदल्या आहेत, आणि ( रस्त्यानें ) झाडें लाविलीं आहेत. ".

३

" माझ्या कारकीर्दीच्या बाराव्या वर्षीं हा आदेश जाहीर करण्यांत येत आहे. माझ्या राज्यांत माझ्या प्रजेनें आणि परकीय लोकांनीं मी घालून दिलेल्या धर्माज्ञा योग्य रीतीनें पाळतां याव्या ह्मणून दर पांच वर्षांनीं प्रायश्चित्त घ्यावें. औदार्य, अहिंसा, अपरिमितता आणि परनिंदा यांचेविषयीं पराङ्मुखता या गोष्टी चांगल्या आहेत. या चांगल्या गोष्टी उपदेश आणि स्वतःच्या वर्तनाचें उदाहरण, यांच्या योगानें लोकांचे मनांत ठसविण्यांत येतील. "

४

" आज कित्येक शतकें प्राण्यांची हत्या, सजीव प्राण्यांनां उपद्रव, बरोबरीच्या विषयीं अनादर आणि ब्राह्मण व श्रमण यांची अवमानना या गोष्टी चालत आल्या आहेत; परंतु आतां प्रियदर्शी राजा दुंदुभीचा नाद, हत्ती, रथ, अश्व, इत्यादिकांची मिरवणूक वगैरे थाटमाट करून सर्व प्रजेस असें जाहीर करीत आहे कीं, हा प्रकार ( प्राण्यांची हत्या ) सजीव प्राण्यांना अपाय, बरोबरीच्या विषयीं अनादर आणि ब्राह्मण व श्रमण यांची मानखंडना यापुढें चालणार नाहीं. धर्माची वृद्धि होईल, आणि प्रियदर्शी राजाचा हा आदेश त्याचे पुत्रपौत्र पाळतील. धर्मसंस्थापनेसाठीं प्रियदर्शी राजाचे आदेश पर्वताप्रमाणें स्थिर रहावेत. प्रत्येक दुराचारी मनुष्य या आदेशाकडे लक्ष देईल तर चांगलें होईल. या आदेशाच्या विरुद्ध जाण्याचें प्रजेपैकीं कोणी मनांत आणूं नये. प्रियदर्शी राजाच्या कारकीर्दीच्या १२ व्या वर्षी हा आदेश जाहीर करण्यांत येत आहे.

५

" चांगल्या गोष्टींचा उपयोग वाईट कृत्यांकडे करणाराला त्या चांगल्या गोष्टीचें फळ अखेर वाईटच मिळतें. ह्मणून मी ( लोकांच्या )

हितासाठीं झटत आहे आणि माझे पुत्रपौत्रही तसेच झटतील, प्रत्येकाला आपापल्या कर्माप्रमाणें फळ मिळेल. आजपर्यंत अधिकाऱ्यांनीं फार अनीति चालू दिली, ह्मणून प्रियदर्शी राजाच्या कारकीर्दीच्या १० व्या वर्षी धर्ममहमात्रा नांवाचे अधिकारी लोकांच्या नीतिमत्तेवर देखरेख ठेवण्यासाठीं नेमण्यांत आले आहेत. लोकांना धर्ममार्गास लावणें हें त्यांचें काम आहे. योन, कांबोज, गांधर, नारिस्तिर्कें (?) आणि पेतेनिक प्रभृति देशांत लोकांमध्यें धर्मवृद्धि ते करतील. क्षत्रिय, ब्राह्मण, भिक्षु, वगैरे सर्व प्रकारच्या लोकांत ते प्रवेश करतील आणि लोकांचें कल्याण करतील. भाविकलोकांना षड्रिपूंचें संयमन कसें करावें तें शिकवितील. पापशृंखलेनें जे लोक बद्ध झाले असतील त्यांना त्या शृंखलेंतून सोडविण्याचा ते यत्न करतील. धार्मिक कृत्यांना उत्तेजन देतील; याच उद्देशानें हा आदेश जाहीर करण्यांत येत आहे. लोक तो पाळोत."

६

" मागच्या कालीं झटपट कामें उरकण्याची आणि सर्वकाळीं हेरांच्या बातम्या ऐकण्याची पद्धति नव्हती. ती पद्धति मी आतां नवीन सुरू केली आहे. जेवतांना, विश्रांतीच्या वेळीं, एकांतांत बसलों असतां, बगीच्यांत हिंडतांना, कोणत्याही वेळीं आणि कोणत्याही ठिकाणीं बातमीदारांनीं माझ्याकडे बेलाशक यावें; लोकांच्या संबंधाचीं जीं कामें असतील तीं मी तात्काळ करीन. याविषयीं मी माझ्या अधिकाऱ्यांना जे हुकूम तोंडी देईन, ते त्यांनीं लोकांना जाहीर करावे. धर्मगुरूंच्या समाजांत कोठें भांडण, वाद अथवा मतभेद झाला तर त्याची बातमी हेरांनीं तत्काळ मला द्यावी. कारण न्यायाचें काम जितकें चोख आणि लवकर होईल तितकें चांगलें. उपदेशद्वारा लोकांचें कल्याण करणें हें माझें कर्तव्य आहे. आणि तें करणें ह्मणजे न्यायपद्धति उत्कृष्ट प्रकारची ठेवणें अवश्य आहे. माझ्या राज्यांत जेवढे लोक आहेत, त्या

---

५४. जनरल कनिंगह्याम साहेब ह्मणतात कीं, रास्तिक [ सुराष्ट्र ] असा हा शद्ब वाचला पाहिजे. 'न'कार मागच्या गांधार शद्बाच्या षष्ठि विभक्तीच्या रूपापैकीं आहे.

सर्वांचें ऐहिक आणि पारमार्थिक कल्याण मला केलें पाहिजे. ह्मणून हा आदेश जाहीर करण्यांत येत आहे. माझे पुत्रपौत्रादि वंशज हा पाळोत, आणि प्रजेच्या हितार्थ झटोत.

७

" मनुष्य नास्तिक असला तरी सद्वर्तन आणि नीति हीं त्याला हवींशीं वाटतात. ह्मणून माझ्या राज्यांत जर कोठें नास्तिक राहत असले तर त्यांना कोणी त्रास देऊं नये. कारण मनुष्याचीं मतें आणि विचार भिन्न असतात; परंतु अखेर त्यांचा उद्देश एकच असतो. सद्वर्तन व नीति हीं कोणास नको असलीं तरी सुद्धां त्या माणसाशीं उदारपणाचें वर्तन ठेवावें. कारण, मनुष्य कितीही नीच वृत्तीचा असला तरी कृतज्ञबुद्धि त्याच्या अंगचे गुण उजेडांत आणल्याशिवाय राहत नाहीं. "

८

" पूर्वींच्या काळचे राजे शिकारीसाठीं किंवा गमतीखातर प्रवासाला निघत असत. देवांचा प्रिय प्रियदर्शी याला आपल्या कारकीर्दीच्या १० व्या वर्षापासून वाटूं लागलें कीं, प्रवास करावयाचा तो पुढील उद्देशानें करावा—ह्मणजे ब्राह्मण आणि श्रमण यांना ठिकठिकाणीं दक्षिणा पोंचते किंवा नाहीं. गुरुजनांना द्रव्यसाहाय्य मिळतें किंवा नाहीं, लोक कसें आचरण ठेवितात, त्यांना नीतिमान् करण्यासाठीं आणखी कोणत्या कायदेकानूंची अवश्यकता आहे इत्यादि गोष्टी प्रत्यक्ष अवलोकन करणें. "

९

" प्रत्येक मनुष्य लग्नकार्य, पुत्रजन्म, शिष्टागमन, वगैरे प्रसंगीं उत्सव करितात. हे दुसऱ्या प्रकारचे उत्सव सर्वांनीं करावे. कर्तव्य-समाप्ति ज्या दिवशीं होईल तो खरा उत्सवदिन असतो. सेवकानें स्वामीची आज्ञा पाळणें, लहानांनीं वडिल माणसांचा सन्मान करणें; सजीव प्राण्या-विषयीं अंतःकरणांत दया बाळगणें; ब्राह्मण आणि श्रमण यांना दानधर्म करणें; या व दुसऱ्या कित्येक गोष्टी ज्या दिवशीं हातून घडतील तो

खरोखर उत्सवाचा दिवस झटला पाहिजे. अशादिवशीं पितापुत्र, स्वामीसेवक या सर्वांना आनंद वाटल्यावांचून राहणार नाहीं. हा उत्सव अवश्य करावा........"

१०

" देवांचा प्रिय प्रियदर्शी हा कीर्ति आणि नांवलौकिक यांची मोठीशी किंमत समजत नाहीं. त्याची कीर्ति जी आहे, ती येवढ्याचसाठीं कीं, त्याचे लोक सदाचारी व्हावे, अशी तजवीज त्यानें करून ठेविली आहे. येवढीच कीर्ति त्याला हवी आहे. याहून निराळ्या कारणामुळें मिळणाऱ्या नांवलौकिकाला तो कवडीमोल समजतो. मतलबी आणि हलकट लोक यांनीं हवा तर हा दुसऱ्या प्रतीचा नांवलौकिक मिळवावा....."

११

" धर्मदानासारखें दान नाहीं. धर्मदानांत पुष्कळ गोष्टींचा समावेश होतो. जसें नोकरचाकराविषयीं ममता; आईबापाविषयीं आदरपूर्वक प्रेम; इष्टमित्रांना उदारपणानें केलेलें साहाय्य; जीवमान प्राण्यांची अहिंसा.........अशा रीतीनें राहिल्यापासून इहलोकीं सुख आणि परलोकीं सुखप्राप्ति होते."

१२

" गृहस्थाश्रमी व यति संन्याशी सर्वांच्या धर्ममार्गाविषयीं देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा आदरबुद्धि ठेवतो, त्या सर्वांना देणग्या देऊन आणि अन्य तऱ्हेनें त्याविषयीं आपली पूज्यबुद्धि व्यक्त करतो; परंतु धर्मवृद्धीसारखें पुण्य कशांतही नाहीं, अशी त्याची समजूत आहे; तो सर्वांना उत्तेजन देतो खरा; परंतु त्या उत्तेजनाच्या मुळाशीं पुढील गोष्टी असतात:—स्वधर्मनिष्ठा, आणि परधर्मसहिष्णुता; कारण, दुसऱ्याच्या धर्माला मदत करण्यांतही स्वधर्मवृद्धि होते. याच्या उलट जो कोणी वागतो तो स्वधर्माची हानि करतो, आणि परधर्माचीही करतो; परंतु जो स्वधर्माचा अभिमान धरून त्याचा प्रसार करण्याच्या बुद्धीनें परधर्माची निंदा करतो, तो स्वधर्मवृद्धीच्या मार्गांत विघ्न आणितो; हें त्याचें वर्तन गैरशिस्त होय. दुसऱ्याचा मान ठेवणें व त्याच्या उपयोगीं पडणें

हें तर प्रत्येकाचें कर्तव्य आहे. देवांचा प्रिय प्रियदर्शी याची हीच इच्छा आहे. ह्मणून त्याच्या आश्रयाखालीं प्रत्येकानें आपापल्या धर्मशास्त्रानुसार चालावें. धर्मतत्त्वांचा प्रसार करणें यासारखें पुण्यप्रद कार्य कोणतेंही नाहीं, असें प्रियदर्शी समजतो. सर्व धर्मांचा हेतु हाच असतो. ह्मणून धर्मप्रसारार्थ आणि नीतिवर्धनार्थ स्त्रीपुरुषांच्या वर्तनावर देखरेख ठेवण्यासाठीं अधिकारी नेमणें वगैरे उपायांपासून धर्माची वृद्धि होऊन नीतीचा उत्कर्ष होईल........"

१३

या आदेशाचा मधलाच कांहीं भाग गेला आहे; तथापि जेवढा भाग उपलब्ध आहे, तेवढ्याचें भाषांतर येथें देतों :—

" देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा यानें विस्तीर्ण कलिंगदेश पादाक्रांत केला. लाखो लोकांना गुलाम ह्मणून बंदिवान केले, एक लाख प्राणांची आहुति यावेळीं पडली; परंतु या कलिंगविजयापासून राजाची वृत्ति धर्माकडे वळली. या कलिंगविजयापासून त्याच्या मनाला इतकी उपरति झाली कीं, त्यानें इतःपर आपलें सर्व तनमनधन धर्मप्रसारार्थ वाहण्याचा संकल्प केला.

नवीन देश जिंकतांना जी प्राणांची हानि होते, तिजबद्दल मला वाईट वाटतेंच; परंतु मला विशेष वाटतें तें यासाठीं कीं, अशावेळीं आपापल्या धर्माप्रमाणें वागणारे, सदाचारी, नीतिमान्, आज्ञाधारक, सच्छील ब्राह्मण, श्रमण व इतर लोक यांना या धामधुमींत फार त्रास सोसावा लागतो, त्यांचे जिव्हाळ्याचीं आणि प्रीतीचीं माणसें लढाईंत मारलीं गेल्यामुळें त्यांच्या वियोगजन्य दुःख भोगावें लागतें, आणि तें स्वतः मोठ्या कष्टानें जीव घेऊन पळाले, तरी त्यांचीं घरेंदारें, इष्टमित्र, सगेसोयरे यांचा सर्वस्वी नाश झालेला त्यांना पाहावा लागतो. कलिंगविजयाचे काळीं असे लाखो लोक कोणी पाण्यांत बुडून मेले, कोणी कापले गेले, कोणी कैद झाले, यामुळें प्रियदर्शी राजाला हजार पटीनें अधिक दुःख होत आहे.........प्राणिमात्राला निर्भयता, आणि मनुष्याच्या वर्तनांतली सदयता या दोन गोष्टी ह्मणजे धर्मविजयाच्या पताका होत! प्रियदर्शी

राजाला आपल्या विस्तीर्ण राज्याविषयीं जो कांहीं अभिमान वाटत आहे, तो याच दोन गोष्टीसंबंधानें होय. यवनांचा राजा अंटियोकस्, आणि त्याच्या पलीकडचे टॉलेमी, अंटिगोनस, मागस, आणि अलेक्झांडर हे चार राजे; दक्षिणेकडे चोल, पांड्य आणि ताम्रपर्णी; तसेंच ग्रीक, कंबोज, नाभक, नाभपंथी, भोज, पेतेनिक, आंध्र, पुलिंद हे सगळे राजे प्रियदर्शीच्या धर्माज्ञेनुसार वागत आहेत. ज्या ज्या ठिकाणीं धर्मोपदेश करण्यासाठीं ह्मणून लोकांना मुद्दाम पाठविण्यांत आलें आहे, तेथील लोक धर्माचा उपदेश ऐकून घेऊन तदनुसार वर्तन ठेवतील....याप्रमाणें सर्वत्र विजय आहे. हें पाहून मला अत्यानंद होत आहे. धर्मविजयाचा आनंद असा विलक्षण असतो; परंतु या विजयाचें फळ परलोकीं जें मिळावयाचें आहे, त्याकडे पाहिलें ह्मणजे हा आनंदही तुच्छ वाटतो. ह्मणून हा आदेश कोरून ठेवण्यांत येत आहे कीं, माझ्या पुत्रपौत्रांनीं तरवारीच्या जोरावर विजय करण्याच्या भरीस पडून लोकांवर जुलूम करूं नये, किंवा त्यांच्या नाशास प्रवृत्त होऊं नये. धर्मविजयासारखा विजय नाहीं हें त्यांनीं पक्कें लक्षांत ठेवावें. ज्या विजयाची योग्यता इह-परलोकीं थोर आहे असा हा धर्मविजयच."

१४

या आदेशांत मागील तेराही आदेशांतलीं वाक्यें व विचार पुनः-पुनः आले आहेत, ह्मणून त्याचें भाषांतर येथें दिलें नाहीं.

**अशोकाचें धर्मौदार्य.**

हे आदेश तत्कालीन इतिहासज्ञानाचीं भांडारें आहेत ह्मणून वर सांगितलेंच आहे. त्यावरून अशोकाचा राज्य-विस्तार, त्याचा कुलवृतांत, धर्माविषयींची त्याची कल्पना, नीतिप्रसारार्थ त्यानें अमलांत आणलेली विशिष्ट योजना, इत्यादि गोष्टींविषयीं बरीच माहिती मिळते, आणि त्यावरून अशोकानें देशाच्या उन्नत्यर्थ घडवून आणलेल्या धर्मक्रांतिविषयींचा अजमास करण्यास पुष्कळ साहाय्य होतें. लेखांच्या आंतील विषयाच्या स्वरूपावरून त्या लेखांचें वर्गीकरण केलें असतां, धर्मविषयक, राज्यविषयक, आणि व्यक्तिविषयक

असे तीन वर्ग करितां येतील. दुसऱ्या स्तंभलेखावरून असें दिसतें कीं, धर्मांत ज्या गोष्टींचा समावेश करण्यांत येत होता त्या गोष्टी ह्मणजे आसिनव ( होईल तों करून कोणाला अपाय न करणें ), उपकार, दया, औदार्य, दान, सत्य, आणि पावित्र्य या होत. त्यावरून मनुष्याचीं ऐहिक कर्तव्यें ठरविण्यांत आलीं होतीं. तीं येणेंप्रमाणें— आईबाप, वृद्ध ( वडील माणसें ), गुरु, इष्टमित्र यांच्या आज्ञा पाळणें, नोकरांच्यासुद्धां शब्दांस मान देणें, ब्राह्मण आणि श्रमण यांना दानधर्म करणें, भाषणांत परिमितता ठेवणें, आणि प्राणिमात्रावर दया करणें. हीं तत्वें हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे सर्व धर्मांना सारखीं मान्य आहेत, आणि या लेखांत बौद्धधर्माला प्रत्यक्ष उद्देशून लिहिलेलें असें कांहीं एक नाहीं. बुद्ध, धर्म आणि संघ ही त्रयी किंवा निर्वाणप्राप्ति यांचा उल्लेख कोठेंही नाहीं. यावरून असें दिसतें कीं, हे शिलालेख सर्व धर्मांच्या आणि सर्व पंथांच्या लोकांनीं वाचावे, आणि त्याप्रमाणें वर्तावें ह्मणून मुद्दाम वादग्रस्त विषय टाळून सर्वमान्य अशा तत्वांचाच तेवढा संग्रह अशोकानें करून ठेविला असावा. परंतु अशोकाच्या धर्मौदार्याचें ठळक प्रमाण त्याच्या लेखांतच सांपडेल. सातव्या आदेशांत त्यानें स्पष्ट ह्मटलें आहे कीं, " मनुष्य नास्तिक असला तरी सद्वर्तन आणि नीति हीं त्याला हवीं असतात ; ह्मणून माझ्या राज्यांत जर कोठें नास्तिक राहत असले तर त्यांना कोणी त्रास देऊं नये ; कारण मनुष्यांचीं मतें आणि विचार भिन्न असले तरी अखेर त्यांचा उद्देश एकच असतो ". भिन्न मताविषयींच्या सहिष्णुतेचें असें उज्जल उदाहरण अन्यत्र क्वचित्च सांपडेल. दुसरी गोष्ट अशोकानें हिंदुधर्माचा त्याग करून बौद्धधर्म स्वीकारला असतांही जेथें तेथें ब्राह्मणांविषयीं त्याची अत्यंत पूज्यबुद्धि दिसून येते, इतकेंच नाहीं, तर प्रत्येक ठिकाणीं श्रमणाबरोबर ब्राह्मणांनाही मानदक्षिणा द्या ह्मणून त्यानें उपदेश केलेला आहे. आतां यज्ञयागादिक ब्राह्मणी धर्मकर्मांचा त्यानें प्रतीकार केला एवढ्यावरून तो ब्राह्मणधर्मद्वेष्टा होता असें कित्येक लोक ह्मणतात. पण या आक्षेपाला एवढें उत्तर बस्स आहे कीं, त्यानें

यज्ञयाग मुळींच करूं नका असें स्पष्ट कोठें ह्मटलें नाहीं. प्राणिमात्राची हिंसा न करितां यज्ञयागादि कर्मे करण्यास त्याचेकडून मनाई नव्हती असें आह्मांस वाटतें.

राज्यविषयक असे जे अशोकाचे आदेश आहेत, त्यांत मुख्यत: हिंसानिषेध, चिकित्सालयांची स्थापना आणि नीतिप्रसारार्थ विशेष योजना अशा तीन गोष्टी येतात. त्यांचा आतां येथें क्रमाक्रमानें विचार करूं.

**हिंसानिषेध.**

अशोक आपल्या पूर्ववयांत मांसाहार करीत असे व त्याच्या पाकशाळेंत रुचिकर मिष्टान्नें तयार करण्यासाठीं दररोज हजार प्राण्यांचा वध होत असे ह्मणून मागें सांगितलेंच आहे. शिवाय तो मूळचा हिंदु असल्याकारणानें यज्ञयागानिमित्तही कित्येक प्राण्यांचा संहार प्रत्यहीं त्याच्या यज्ञशाळेंत होत असला पाहिजे. असें असतां त्याला उपरति झाल्याबरोबर त्यानें सगळी हिंसा एकदम बंद केली ह्यावरून त्याचा निश्चयी स्वभाव व्यक्त होतो. ब्राह्मण यज्ञयागासाठीं हिंसा करीत असत. त्यांनीं या राजानुशासनाज्ञेमुळें ‘ आमचा धर्म बुडाला हो ठार बुडाला ’ ह्मणून थोडा आक्रोश केला असेल असें नाहीं. तसेंच क्षत्रिय आहारासाठीं प्राणिवध करीत, त्यांचाही आपला सनातन हक्क बुडाल्याबद्दल अतिशय संताप झाला असेल. परंतु भलत्याच गोष्टींत त्यांच्या आक्रोशाला आणि संतापाला जुमानणाऱ्यांपैकीं अशोक हा नव्हता. हिंसेचा निषेध करतांना श्रुतिस्मृतींचे आधार दाखवून ब्राह्मणांना मांसाहार विहित आहे किंवा निषिद्ध आहे हें ठरविण्याच्या भानगडींत तो मुळींच पडला नाहीं, किंवा पुनर्जन्माच्या तत्त्वावरही त्यानें लोकांची समजूत घालण्याचा यत्न केला नाहीं. तर केवळ भूतदयेच्या तत्त्वावर त्यानें त्या गोष्टीचा प्रतिबंध केला. आणि ह्मणूनच त्याच्या प्रयत्नास अखेर यश आलें. राजसूय, अश्वमेधासारखे यज्ञ बंद पडले, आणि इतर यज्ञांतही प्राण्यांच्या बळींचे ऐवजीं दूध, लोणी, चरु इत्यादि द्रव्यांचा उपयोग करण्याचा प्रचार सुरू झाला, याबद्दलचें श्रेय खरोखर अशोकाला दिलें पाहिजे.

या पृथ्वीतलावर आजपर्यंत कोणीही केलें नव्हतें असें एक महत्-कार्य अशोकानें आपल्या कारकीर्दीत करून ठेविलें होतें. त्यानें मनुष्यें व पश्वादि प्राणी यांचेसाठीं स्वतंत्र चिकित्सालयें स्थापिलीं होतीं. मनुष्याकरितां चिकित्सालयें ( हॉस्पिटलें ) स्थापन करण्याचें श्रेय ख्रिस्तीधर्माकडे आहे, ह्मणून आढयतेनें प्रौढी मिरविणाऱ्यांनीं मनुष्याकरितांचशीं काय, पण पश्वादि कनिष्ठ वर्गांतील प्राण्याकरितां सुद्धां चिकित्सालयें स्थापन करणारा एक पुरुष ख्रिस्ताच्याही अगोदर अडीचशें वर्षें होऊन गेला हें ध्यानांत धरावयाजोगें आहे. उच्च प्रतीच्या सदयतेचें हें त्यानें घालून दिलेलें उदाहरण इतिहासांत अजरामर होऊन राहील येवढी त्याची योग्यता आहे. मनुष्याकरितां घातलेल्या औषधालयापेक्षां पश्वादिकांसाठीं चिकित्सालय घातल्याचें पुण्य विशेष आहे. गाई, ह्मशी, घोडे, इत्यादि प्राण्यांचा मोडलेला पाय मलमपट्टी वगैरे बांधून नीट केला, किंवा व्याधिग्रस्त दुर्बल अशा जनावराला घासभर चारा आणि घोटभर पाणी दिलें तर त्या उपकाराबद्दलच्या कृतज्ञेचें चिन्ह त्या मुक्या जनावराच्या अश्रूपूर्ण डोळ्यांत जसें स्पष्ट दिसून येतें, तसें बुद्धि आणि वाचा एतद्विशिष्ट मनुष्यप्राण्याच्या सुद्धां चर्येंत क्वचित् दिसेल. ही गोष्ट दोन हजार वर्षांपूर्वींच अशोकाच्या लक्षांत येऊन त्यानें आपल्या राज्यांत सर्वत्र अशा चिकित्सालयांची स्थापना केली, आणि हिमालयादि पर्वतांतून दुर्मिळ वनस्पति व औषधिद्रव्यें आणवून तीं प्रत्येक ठिकाणीं बगीच्यामधून वगैरे लावावीं, ह्मणून अधिकाऱ्यांना हुकूम सोडले, ही गोष्ट विचार करण्यासारखी व अभिमान वाटण्याजोगी आहे, असें कोण ह्मणणार नाहीं? प्राणिमात्राविषयीं जी ही येवढी दया त्याच्या अंतःकरणांत जागृत झाली, तिला कारण बौद्धधर्म होय यांत शंका नाहीं. बुद्धाचे पूर्वी मांसाहार ब्राह्मणांना विहित होता किंवा निषिद्ध होता, हा प्रश्न जरी बाजूला ठेविला, तरी हिंदुधर्माच्या भूतदयेची मर्यादा बौद्धधर्मापेक्षां पुष्कळ संकुचित होती, येवढी गोष्ट तरी प्रत्येकास निरभिमानतया कबूल करावी लागेल. हिंदुस्थानच्या बाहेरच्या इतर कोणत्याही धर्मांत ती

याहूनही ज्यास्त संकुचित आढळेल. यहुदि आणि मुसलमानी धर्मांत कांहीं विशिष्ट प्रकारचें मांस निषिद्ध मानलें आहे. ख्रिस्तीधर्माचा नंबर तर याच्याहून बराच खालीं लागेल. मनुष्यांना तेवढा आत्मा, जनावरांना नाहीं; बाकीचे सगळे जीव परमेश्वरानें मनुष्यासाठीं खाद्य ह्मणून निर्माण केलेले आहेत, अशी त्याधर्माची समजूत आहे, आणि ह्मणून नरमांस तेवढें खेरीज करून बाकीच्या कोणत्याही प्राण्याचें मांस तद्धर्मीयांना चालतें. आजकाल पशुविषयक निष्ठुरतानिवारक मंडळ्या पाश्चात्य देशांत निर्माण होऊं लागल्या आहेत; परंतु त्यांचा उद्देश तरी येवढाच आहे कीं, पशूंना मारतांना हाल करावयाचे नाहींत. फ्रान्समधिल राज्यक्रांतीच्या वेळीं ज्याप्रमाणें गिलोटीन नामक यंत्रानें मनुष्याची मान घालून क्षणार्धांत तिला धडापासून निराळी करीत, तशा रीतीनें पशूंना मारण्यास हरकत नाहीं. याहून ज्यास्त भूतदया पाश्चात्यांच्या अंगीं दिसून येत नाहीं. याला कारण, मला एकच दिसतें. तें हें कीं, मनुष्याप्रमाणें इतर क्षुद्र प्राण्यांनाही आत्मा आहे, ही कल्पना व पुनर्जन्माची कल्पना हिंदुधर्म व बौद्धधर्म यांत जशी आहे, तशी इतर कोणत्याही धर्मांत नाहीं. आणि ह्मणूनच 'अहिंसा परमो धर्मः' ह्या उदार तत्वाचें अवलंबन या दोन धर्मांनीं, विशेषतः बौद्ध धर्मानें जसें पूर्णपणें केलें, तसें इतरत्र केलेलें आढळत नाहीं.

**राज्यव्यवस्था-विषयक.**

अशोकानें आपल्या राज्यांत नीतिप्रसारार्थ कांहीं विशेष योजना केली होती, असें त्याच्या ९ व्या व ६ व्या आदेशावरून दिसून येतें. "आजपर्यंत अधिकाऱ्यांनीं फार अनीति चालूं दिली" हें अशोकाला सहन न होऊन त्यानें लोकांच्या नीतिमत्तेवर कडक नजर ठेवण्यासाठीं 'धर्ममहामात्रा' ह्मणून कांहीं विशिष्ट अधिकाऱ्यांची नेमणूक केली होती. यांनीं सर्व प्रकारच्या उच्च नीच वर्गांतल्या लोकांमध्यें भेदभाव न धरितां मिसळून, त्यांच्या वर्तनावर नजर ठेवावी. त्यांना सद्धर्माचा उपदेश करून सन्मार्गाकडे जाण्याविषयीं त्यांचीं मनें प्रवृत्त करावीं, दुष्टांचें शासन करावें व शिष्टांस मान सन्मान द्यावा

याप्रमाणें त्यांच्याकडे कामें सोंपविलीं होतीं. याशिवाय वचभूमिक आणि रज्जुक अशा दोन हुद्यांचे कांहीं अधिकारी असत. लोकांच्या वागणुकीवर देखरेख करणें हें वचभूमिकांचें काम असे, आणि या अधिकाऱ्यांना वेळोवेळीं उत्तेजन व लागेल ती मदत देण्याकरितां रज्जुकांची योजना केली होती. या रज्जुकांची एक परिषद् भरत असे व ती धर्मविषयक प्रश्नांचा खल करीत असे.[५५]

उपदेशाच्या द्वारें लोकांमध्यें धर्म व नीति यांचा प्रसार करावयाचा येवढाच अशोकाच्या लेखांचा उद्देश असल्यामुळें, या दोन विषयांपलीकडे त्याच्या इतर राज्यव्यवस्थेबद्दलची कांहीं फारशी माहिती या लेखांत आढळत नाहीं. तथापि जी कांहीं अगदीं थोडी माहिती सांपडते तिजवरून त्याच्या राज्यव्यवस्थेबद्दलची थोडीशी कल्पना आपणांस करितां येते. अशोकानें आपल्या राज्यांतल्या प्रत्येक प्रांतांत एकेक मुख्याधिकारी नेमिला असे. त्याचें नांव प्रादेशिक, व प्रादेशिकांच्या कारभारावर देखरेख ठेवण्यासाठीं महामात्रांची ( अमात्य ) नेमणूक केली होती. अतिशय निकडीचीं कामें हेच अधिकारी पाहत असत. सरहद्दीसंबंधानें तंटेबखेडे मोडून तिचें संरक्षण करण्याच्या कामावर अंतमहामात्रा नांवाच्या अधिकाऱ्यांची नेमणूक केली असे. अंत:पुरांतील व्यवस्था पाहणारे खाजगी अधिकारी स्वतंत्र असत. त्यांना इतिझकमहामात्र ( ? ) ह्मणत. फांशीची शिक्षा देण्याच्या कैद्यांस त्यांच्या शिक्षेचा दिवस ठरला ह्मणजे ईश्वराची प्रार्थना करण्यासाठीं अगोदर तीन दिवसांची मुदत देत. अशोकाच्या राज्यव्यवस्थेबद्दल याहून अधिक माहिती मिळत नाहीं, ही मोठी शोचनीय गोष्ट ह्मटली पाहिजे. कारण ती माहिती मिळती, तर तिजवरून दोन हजार वर्षांपूर्वी अर्ध्या अधिक हिंदुस्थानाएवढ्या प्रचंड राज्याची व्यवस्था आमचे आर्य चक्रवर्ती प्रभू कशाप्रकारें करीत असत, तें कळण्याचें उत्कृष्ट साधन झालें असतें, आणि हल्लींच्या सुधारलेल्या राज्यपद्धतीशीं ती राज्यव्यवस्था लावून पहाण्याची उत्तम संधि प्राप्त झाली असती.

---

५५ M. Senart's paper in the Indian Antiquary.

# प्रकरण १०वें.

## वार्धक्य आणि मृत्यु.

" मृत्यु हरितसे समयीं अमरांसहि; कवण मृत्युला चुकवी?—मयुरकवि

" नाहीं देहाचा भरवंसा। केव्हां सरेल वयसा ॥
प्रसंग पडेल कैसा ॥ कोण जाणे ॥ १ ॥
या कारणें सावध असावें। जितुकें होईल तितुकें करावें ॥
भगवत्कीर्तीनें भरावें ॥ भूमंडळ ॥ २ ॥—रामदास.

**वार्धक्य आणि मृत्यु.**

अशोकाचें आतां उतारवय होत चाललें होतें, आणि या संसारांत जे शोकभोग मनुष्यास प्राप्त होतात, ते अशोकासही अनुभवावे लागले होते, यामुळें त्याचें शरीर बरेंच क्षीण झालें होतें. त्याचा प्रत्यक्ष भाऊ वीताशोक भिक्षुव्रत आचरून राहत असतां, एका अमीरानें त्याचें डोकें कापून राजाला नजर केलें ह्मणून मागें सांगितलेंच आहे. पुढें त्याचा सच्छील आणि सद्गुणीपुत्र कुनाल हा आपली सावत्र आई तिष्यरक्षिता हिच्या चक्रांत सांपडून बिचारा दृष्टिसुखास विनाकारण अंतरला आणि दुसऱ्याही अनेक प्रकारें त्याचा छळ झाला. या योगानें राजाचें मन सदोदित विव्हळत होतें. त्याचा दुसरा पुत्र महिन्द व कन्या संगमित्रा यांपैकीं कोणीही मुख्य पट्टराणीच्या पोटीं जन्मास न आल्यामुळें, अशोकाच्या मागें त्याच्या गादीवर या दोघांचाही हक्क नव्हता, आणि त्यांनीं राज्यपदाची इच्छाही न धरतां धर्मजीवनाचाच स्वीकार करून, धर्मप्रसारार्थ सिंहलद्वीपास प्रयाण केलें होतें हें मागें सांगितलेंच आहे. सारांश अशोकाला आपलें ह्मणण्यासारखें मायेचें कुटुंबांतील कोणी मनुष्य उरलें नव्हतें. नाहीं ह्मणावयाला कुनालाचा मुलगा संपदि येवढा काय तो उरला होता. बालपणांत किंवा तरुणपणांत आप्तजनासंबंधानें मनुष्य मोठीशी फिकीर करीत नाहीं. पण मयूर कवीनें ह्मटल्याप्रमाणें ‘ कृतांतकटकामलध्वजजरा ’ दिसूं लागून ‘ पुरःसरगदासवें झगडतां तनू भागली ’ ह्मणजे त्याला आपल्या कुटुंबां-

तलीं सगळीं माणसें जवळ करण्याची इच्छा होते. अशोक या मनुष्य-स्वभावाला अपवाद होता असें नाहीं; परंतु अशी इच्छा उत्पन्न झाली असतांही ती सफल होण्याचें कांहीं चिन्ह न दिसणें हें मात्र अत्यंत दुर्भाग्य असतें. तसलें दुर्भाग्य अशोकाच्या वांट्याला आलें होतें. यामुळें त्याची हिंमत खचून संसाराविषयीं उद्विग्नता आणि विरक्तता त्याचे मनांत उद्भवली. शेवटीं त्यानें भिक्षुव्रताची दीक्षा घेतली. याविषयीं एक चमत्कारिक कथा कित्येक ग्रंथांतून आढळते.

**दानधर्म.** ती अशी. "एके दिवशीं राजा अशोक यानें आपला गुरु आचार्य उपगुप्त याला विचारिलें कीं, बौद्धांमध्यें आजपर्यंत दानधर्म सर्वांत अधिक कोणी केला? उपगुप्त ह्मणाला—अनाथपिंडिक नांवाच्या गृहस्थानें. हा अनाथपिंडिक स्रवस्ति नामक नगरींत राहत असतां, बुद्धमहाराजाची स्वारी तेथें आली, तेव्हां त्यांना राहण्यासाठीं त्यानें जेतवेन नामक आपलें सुंदर विस्तीर्ण उद्यान दिलें. बुद्ध चातुर्मास्यांत याच उद्यानांत आपल्या शिष्यपरिवारासह राहत असे. हें ऐकून राजानें विचारलें कीं, त्यानें आजपर्यंत किती दानधर्म केला असेल? उपगुप्त ह्मणाला–शंभर कोटी सुवर्णमुद्रा. तेव्हां अशोक ह्मणाला–ठीक आहे. मीही शंभरकोटी सुवर्णमुद्रा देतों त्या घ्या. मी आजपर्यंत ८४००० स्तूप व विहार बांधले. त्या प्रत्येक स्तूपाप्रीत्यर्थ एक एक लक्ष सुवर्णमुद्रा मी देतों. आणि त्याचप्रमाणें ज्याठिकाणीं शाक्य गौतम जन्मला, व जेथें बुद्ध झाला, जेथें त्यानें धर्मोपदेश केला, आणि शेवटीं जेथें तो निर्वाणाप्रत पावला, त्या सर्व ठिकाणींही अशाच एकेक लक्ष मुद्रा मी देतों. चातुर्मास्यांत सर्व भिक्षू व भिक्षुणी यांनीं माझ्या येथें येऊन माझ्या आतिथ्याचा स्वीकार करावा अशी माझी विनंति आहे. आणि तेवढ्यासाठीं चार लक्ष सुवर्णमुद्रा मी काढून ठेवितों. तसेंच तीनहजार भिक्षूंचें सदोदित परिपालन करण्याची तजवीजही मी करून ठेवितों. तसेंच माझी स्वतःची व माझ्या स्त्रीपुत्रांची जी खाजगी भूमिगत संपत्ति असेल, ती सगळी दान केली आहे असें समजावें. नगद रोकड जी असेल तिच्यावर मात्र आह्मीं आपला हक्क ठेविला आहे.

ह्या रोकडींतल्या चार लाख सुवर्णमुद्रा देऊन ती भूसंपत्ति आह्मीं पुनः विकत घेतली आहे. एकंदर ९६ कोटी सुवर्णमुद्रांचा दानधर्म मी केला आहे. असें बोलून राजानें आपली सगळी व्यवस्था सांगून टाकली. या बोलण्यानें राजाला थकवा आला आणि तक्क्यावर अंग टाकून तो कांहीं वेळ स्तब्ध बसला. मी आतां फार दिवस वाचत नाहीं, असें त्यानें तेव्हांच उपगुप्तास सांगितलें. "

महाराज अत्यवस्थ आहेत ही बातमी ऐकतांच प्रधान राधागुप्त गडबडीनें येऊन दाखला झाला. तेव्हां राजाच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह चालला होता. हें पाहून साष्टांग प्रणिपात घालून हें काय ह्मणून प्रधानानें प्रश्न केला. अशोक ह्मणाला :— "राधागुप्त, धन, राज्य, संसार यांना टाकून मला आतां जावें लागणार ह्मणून मला दुःख होतें असें नाहीं. मला दुःख होत आहे तें येवढ्याचसाठीं कीं, मी स्थापिलेल्या आर्यसंघाशीं आतां माझा चिरकाल वियोग होणार. इतःपर त्या संघाला लागणारें जीवन माझ्याहातून त्याला आतां मिळणार नाहीं. राधागुप्त, बुद्धप्रभूच्या धर्मप्रसारार्थ शंभर कोटी सुवर्णमुद्रा दान करण्याचा मी संकल्प केला होता हें तुह्मांस ठाऊक आहेच. परंतु तो संकल्प माझे हातून अद्याप पार पडला नाहीं, याचें वाईट वाटतें. ९६ कोटीची तर व्यवस्था लाविली. अजून चार कोटी पाहिजे आहेत "

कुनालाचा पुत्र संपदि हा आतां युवराज ( गादीचा वारस ) होता.

**संपदीच्या बुद्धिचा क्षुद्रपणा.**

राजानें आपल्या खजिन्याची अशी वाताहत केलेली पाहून मंत्री घाबरले आणि त्यांनीं धांवत धांवत जाऊन युवराजाला ही गोष्ट कळविली. ते ह्मणाले " धर्मावतार थोरले महाराज आतां फार थोड्यादिवसांचे सोबती आहेत. परंतु आपणांस अजून दीर्घकाल राज्य करणें आहे. तेव्हां थोरले महाराजांनीं सगळा खजिना कुक्कुटारामाकडे ( आचार्य उपगुप्ताचा मठ ) पाठवून आपला सर्वस्वी नाश मांडिला आहे त्याचें निवारण करणें आपणांस उचित आहे. " हें ऐकून संपदि याचें मन वळलें आणि आतां याउपर खजिन्यांतून पैसा देऊं नका ह्मणून त्यानें

मंत्र्यांना ताकीद दिली. अशोकराजा रोज सुवर्णपात्रांत भोजन करीत असे आणि भोजनोत्तर तें ताट कुक्कुटारामाकडे पाठवून देत असे. परंतु मंत्री दररोज नवें सुवर्णताट देण्याचे ऐवजीं आतां चांदीचें ताट देऊं लागले. अशोकानें तें पूर्वीच्या प्रमाणें भोजनोत्तर कुक्कुटारामाकडे पाठविण्याचा क्रम सुरू ठेविला. पुढें चांदीचें ताटही बंद झालें. तेव्हां शेवटीं खापराच्या थाळींत तो जेऊं लागला. एके दिवशीं मंत्रिजन त्याच्या समाचारासाठीं आले असतां, राजा हातांत आंवळ्याचें अर्धें शकल घेऊन ह्मणाला—" मंत्रिगणहो, या देशाचा राजा कोण आहे ? " मंत्री विस्मित होऊन हात जोडून ह्मणाले—" महाराज हें काय विचारणें ? हें राज्य आपलेंच आहे ". हें उत्तर ऐकून राजाचे डोळे अश्रूंनीं भरून आले. तो ह्मणाला—" खरें बोलतां ? मी राज्यभ्रष्ट झालों नाहीं काय ? हें पहा, आंवळ्याच्या या अर्ध शकलाखेरीज माझें असें आतां कांहीं एक राहिलें नाहीं. मी सार्वभौम राजा असून कोणाला कांहीं देईन ह्मटलें तर देण्यास मजजवळ कांहीं एक नाहीं. धिक् हें ऐहिक साम्राज्य. पाण्यावरच्या तरंगाप्रमाणें अस्थायी असें जें हें प्रभुत्व त्याला धिक्कार असो. मी लोकांचा राजा, पण दुःखानें माझ्यावरही राज्य चालविलें. ज्यानें सगळ्या पृथ्वीचें एकछत्री राज्य केलें, अनेक युद्धांत जय मिळविला, बंडें मोडलीं, हजारों मी मी ह्मणणाऱ्या शत्रूंना चीत केलें आणि गरीबांचें रक्षण केलें, तोच हा अशोक आतां राज्यभ्रष्ट होऊन दुःखांत दिवस कंठीत आहे, याहून दैवदुर्विपाकाचें ढळढळीत उदाहरण दुसरें कोठें आढळेल ? झाडावरचें पान किंवा फूल त्याच्या फांदीवर असतें तोंपर्यंतच त्याची शोभा असते. तें खालीं गळून पडलें कीं, लागलीच सुकून जातें. तशीच मजसारख्या राजांची स्थिति ह्मटली पाहिजे. गळून पडलेल्या सुगंधहीन, सौंदर्यरहित पुष्पाप्रमाणें शुष्क आणि निस्तेज होऊन मी दिवस कंठीत आहें ".

अशोकानें दुसऱ्या एका माणसास बोलावून त्याला ह्मटलें—" हे बंधो, माझे हातीं हुकूम करण्याचा कांहीं अधिकार राहिला नाहीं खरा; परंतु विनंति करण्यास हरकत नाहीं. ही माझी शेवटची विनंति तूं मान्य

कर. तूं कुक्कुटारामामध्यें जाऊन हें आंवळ्याचें शकल माझ्या नांवानें तेथें असलेल्या आचार्यांच्या चरणांचें वंदन करून त्यांना ह्मण कीं, राजाधिराज अशोक याच्या ऐश्वर्याचा हा येवढाच अवशिष्ट भाग राहिला आहे, तोही आपले चरणीं त्यानें अर्पण केला आहे. या फलाचा अंश संघांतल्या सर्वजणांना मिळेल अशी तजवीज करणें आपणाकडे आहे. "

**पृथ्वीदान व देहावसान.**

मग राधागुप्ताकडे वळून अशोक ह्मणाला— " मंत्रिराज, या देशच्या गादीवर आतां राजा कोण आहे? ' राधागुप्तानें पूर्वीप्रमाणेंच ' महाराज, आपणच आमचे स्वामी आहां ' ह्मणून उत्तर केलें. तें ऐकतांच अशोक आपल्या आसनावरून उठला आणि आकाशांकडे चारी दिशांस दृष्टि फिरवून मोठ्यानें ह्मणाला—' आज आपलें धनभांडार खेरीज करून बाकीची ही सगळी बहुरत्ना वसुंधरा मी बुद्धसंघाला अर्पण केली आहे. या पुण्यकर्माचें फल मला मिळो. मला पुढले जन्मीं राज्यसुख मिळावें, किंवा इंद्रभुवन प्राप्त व्हावें किंवा ब्रह्मलोकाची प्राप्ति व्हावी असें मी इच्छित नाहीं. ह्या सगळ्या गोष्टी पाण्यावरच्या बुडबुड्याप्रमाणें क्षणजीवी अर्थात् नश्वर आहेत. धर्माचे ठायीं माझी जी दृढश्रद्धा आहे, तिचा मोबदला मला येवढाच मिळावा कीं, आत्मसंयमन मला करतां यावें. पृथ्वीचें साम्राज्य क्षणभंगुर; परंतु आत्म्यावरचें साम्राज्य चिरस्थायी असतें.' याप्रमाणें सगळ्या पृथ्वीचें दानपत्र लिहून आणण्यास राधागुप्तास सांगितलें, आणि दुसरे दिवशीं तें आणिल्यावर आपल्या हातानें त्यावर शिक्कामोर्तब करून तें कुक्कुटारामांत पाठवून दिलें.[५६] तें पत्र तिकडे आचार्यांच्या हातीं पडतांच इकडे राजानें इहलोकींची यात्रा संपवून परलोकास प्रयाण केलें!

---

५६ अशोकानें तीन वेळां जंबुद्वीपाचें दान केलें होतें, आणि तिन्हीवेळ संघाला योग्य किंमत देऊन तें सोडवून आणिलें, अशाबद्दल त्याच्या शिलालेखांत उल्लेख आहे, ह्मणून फाहयान या प्रवाशाच्या प्रवासवर्णनांत ह्मटलें आहे. पण हा लेख आमचे पाहण्यांत कोठें आला नाहीं.

अशोकाची अंत्येष्टिक्रिया वगैरे आटोपल्यावर राधागुप्तानें मंत्रिवर्गाला एकत्र जमवून त्यांना सांगितलें कीं, अशोक महा-

**त्याचे वंशज.**

राजांनीं शंभर कोटी सुवर्णमुद्रा दान करण्याचा संकल्प केला होता. पैकीं ९६ कोटीच दिल्या गेल्या व चार कोटी द्यावयाच्या राहिल्या आहेत. परंतु ही थोरल्या महाराजांची अवशिष्ट राहिलेली इच्छा युवराज पूर्ण करितील असें न दिसल्यावरून महाराजांनीं सगळी पृथ्वी दान करून टाकली. तेव्हां आतां आपण एक काम केलें पाहिजे, तें हें कीं, या चार कोटी सुवर्णमुद्रा संघाला देऊन टाकून त्यांचे हातून राज्य सोडवून आणावें, अर्थात् चार कोटीला पुनः राज्य विकतच घ्यावयाचें असें ह्मटलें तरी चालेल. राधागुप्ताची ही सल्ला सर्वांना पसंत पडली, आणि त्याप्रमाणें त्यांनीं लागलीच ती सल्ला अमलांतही आणिली. याप्रमाणें संघाच्या हातून सोडविलेल्या राज्यावर अशोकाच्या मागून संपदि बसला. त्यानंतर त्याचा पुत्र बृहस्पति गादीवर बसला. बृहस्पतीच्या नंतर वृषसेन, सूर्यवर्मन् व पुष्पमित्र हे राजे झाले. विष्णुपुराणांत लिहिलें आहे कीं, अशोक आणि संपदि यांचे मागून मगधाच्या गादीवर मौर्यवंशांतले सहा राजे गादीवर बसले, आणि त्यांचीं नांवें--सुयश, दशरथ, संगत, शालिशुक, सोमशर्मन्, आणि बृहद्रथ अशीं दिलीं आहेत. बृहद्रथाच्या मागून त्याचा सेनापति पुष्पमित्र बृहद्रथाला मारून राज्यारूढ झाला असें सांगतात. हा पुष्पमित्र

**पुष्पमित्र व बौद्धांचा छळ.**

बौद्धांचा अतिशय मोठा द्वेष्टा होता. अशोकानें जेवढी कीर्ति मिळविली, तेवढी यानें त्याच्याच गादीवर बसून घालविली. यानें बुद्धगया येथील बुद्धमंदिरांतली बुद्धाची मूर्ति काढून त्या जागीं शिवाची मूर्ति स्थापन केली. कुक्कुटारामाचा सत्यानास करून त्यांत राहिलेल्या भिक्षुभिक्षुणींचा अति क्रूरपणानें वध केला. ज्या ज्या ठिकाणीं बौद्धधर्मी लोक राहत होते, त्या त्या ठिकाणीं जाऊन त्यांना छळिलें, त्यांचे स्तूप व विहार यांना आग

**कनिष्क.**

लावून त्यांची रक्षा केली. पुष्पमित्राच्या मागून शुंगवंशांतले राजे पाटलिपुत्र येथें राज्य करूं लागले.

या पुढची कांहीं काळपर्यंतची हकीकत उपलब्ध नाहीं. पुढें कनिष्क ह्मणून एक प्रबळ पराक्रमी व धार्मिक असा राजा झाला. त्यानें बौद्धधर्माची पताका पुनः एकवार सगळ्या भरतवर्षांत फडकाविली. याच्याच कारकीर्दीत बौद्धांची चवथी महासभा भरविण्यांत आली होती.

---

# प्रकरण ११ वें.

## समालोचन.

Something mighty and sublime
Leave behind to conquer time;
Glorious 'tis to live for aye,
When these forms have passed away!

*Goethe.*

अशोकाच्या कारकीर्दीला हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांतलें सुवर्णयुग असें योग्य नांव एका इतिहासकारानें दिलें आहे, आणि तो काल सुवर्णयुगाचाच होता याविषयीं कोणीही शंका घेणार नाहीं. अशोकाच्या राज्याचा विस्तार पाहिला, किंवा त्या काळची देशस्थिति व शांतता यांचा विचार केला, अथवा नीति आणि धर्म यांपासून भ्रष्ट झालेल्या लोकांना पुनः सन्मार्गास लावून देण्याचें जें अत्यंत महत्कार्य अशोकानें केलें तें लक्षांत घेतलें, ह्मणजे सुवर्णयुग या नांवाची सार्थता व्यक्त होते. हिंदुस्थानांत--किंबहुना--पृथ्वीतलावर आजपर्यंत जे महाबलाढ्य, राजकार्यकुशल, प्रजापालनतत्पर आणि सद्धर्मप्रवर्तक राजे होऊन गेले, त्यांच्या मालिकेंत अशोकाला अग्रस्थान मिळालें पाहिजे, अशी त्याची योग्यता होती. इतिहासप्रसिद्ध राजे व बादशहा यांच्याशीं त्याची तुलना करून पाहिली असतां, आमचें हें विधान ह्मणजे केवळ चरित्रकारांच्या अंगीं खिळलेल्या अतिशयोक्तिदोषाचें उदाहरण नव्हे, असें कोणाही निःपक्षपाती गृहस्थास कबूल करावें लागेल. फ्रान्सचा बादशहा नेपोलियन, इराणचा कायरस्, जर्मनीचा शार्लमेन, रशियाचा पीटर धि ग्रेट, ग्रीसचा अलेक्झांडर,

रोमचा कॉन्स्टंटाईन आणि दिल्लीचा अकबर या सर्वांहून अशोकाची योग्यता कांहीं विशेष होती हें सहज दाखवितां येईल. अशोक नेपोलियनासारखा धाडशी आणि शूर होता, परंतु नेपोलियनाप्रमाणें महत्वाकांक्षेच्या पायीं त्यानें आपला समूळ नाश करून घेतला नाहीं. सायरसाप्रमाणें त्यानें दुसरीं राज्यें पादाक्रांत करून विपुल धनसंचय केला होता, पण त्यामुळें गर्वानें तो कधीं ताठला नाहीं. पीटर धि ग्रेट याच्या सारखा तो प्रजावत्सल होता. पण पीटरप्रमाणें प्रजेच्या केवळ ऐहिक हितालाच त्यानें स्वतःस वाहून घेऊन तो थांबला नाहीं, तर ऐहिक हिताहून अनंत पटीनें श्रेष्ठ आणि चिरंतन असें जें पारलौकिक सुख त्यासाठीं त्यानें आपलें तन मन धन अर्पिलें होतें. अलेक्झांडरासारखा त्यानें दिग्विजय केला, पण सगळें जिंकल्यावर आतां आपणास जिंकण्यास कांहीं उरलें नाहीं ह्मणून दुःख करीत त्यानें अश्रू गाळिले नाहींत; उलट मनोविकार जिंकण्याचें काम दिग्विजयाहूनही कठीण आहे, असें तो ह्मणत असे, आणि तें दुष्कार्यही आपल्या निश्चयाच्या प्रभावानें त्यानें साध्य केलें होतें. अशोकाला बौद्ध धर्माचा कॉन्स्टंटाईन ह्मणतात, पण त्या रोमन बादशहापेक्षां अशोकाची योग्यता मोठी होती. कारण कॉन्स्टंटाईननें स्वतः ख्रिस्ती धर्म स्वीकारून त्या धर्माला एक प्रकारचें राष्ट्रीय स्वरूप दिलें, ही गोष्ट खरी आहे, आणि ह्मणून त्याला ख्रिस्ती धर्माचा पुरस्कर्ता ह्मणण्याचा प्रघातही आहे. पण अशोकानें याच्या पलीकडे मजल मारलेली होती. अशोकानें स्वतः बौद्ध धर्माचा स्वीकार केला, इतकेंच नाहीं, तर त्या धर्माच्या प्रसारार्थ कायावाचामनें-करून परिश्रम केले; ठिकठिकाणीं लेख कोरून ठेविले, देशोदेशीं उपदेशक पाठविले, फार काय, पण प्रत्यक्ष आपला मुलगा महिन्द व मुलगी संगमित्ता यांना सिंहलद्वीपासारख्या दूर प्रदेशीं धर्मोपदेशक ह्मणून पाठविलें. सारांश, अशोक बौद्ध धर्माचा पुरस्कर्ताचसा काय पण प्रचारक, प्रतिपालक, प्रेषित [ apostle ] होता असें ह्मणणें जास्त योग्य होईल. अशोक झाला नसता तर गौतमबुद्धानें महत्प्रयासानें लावलेल्या धर्माचें रोप जीवनाभावामुळें कधींच करपून गेलें असतें. अशोकानें देशोदेशीं

धर्मोपदेशक पाठविले नसते तर, चीन, जपान, ब्रह्मदेश, तिबेट, सयाम, सिंहलद्वीप या ठिकाणीं बौद्ध धर्माचा प्रसार झाला असता किंवा नाहीं याची शंकाच होती ; आणि या देशांत बौद्ध धर्माचा शिरकाव झाला नसता ह्मणजे आजच्या काळीं पृथ्वीतलावर बौद्ध धर्माचें चिन्ह कोठेंही दिसलें नसतें हें उघड आहे. या दृष्टीनें पाहिलें ह्मणजे अशोकाला बौद्धधर्माचा पिता अथवा आधारस्तंभ ह्मटलें पाहिजे. खुद्द हिंदुस्थानच्या इतिहासांत पाहतां अनेक गोष्टींत अशोकाशीं ज्याचें साम्य आहे, असा एकच बादशहा होऊन गेला. तो दिल्लीचा अधिपति अकबर बादशहा हा होय. दोघांचेही आजे– अकबराचा आजा बाबर आणि अशोकाचा चंद्रगुप्त बाहुबलानें स्वतंत्र राज्य संपादणारे, पराक्रमी आणि कुलदीपक होते. अकबर आणि अशोक दोघेही विद्वानांचे पुरस्कर्ते होते. अकबराचे पदरीं जसे अबुल फजल, बेदोनी व फैजी यांच्यासारखे नामांकित ग्रंथकार होते, तसे अशोकाच्या पदरीं आचार्य उपगुप्त व मोग्गलीपुत्र तिष्य यांच्यासारखे विद्वान्, धर्मग्रंथांचें उत्तम रीतीनें परिशीलन केलेले भिक्षू होते. अकबरानें भिन्न भिन्न धर्ममतांचे संशोधन करण्यासाठीं एक धर्मसभा स्थापिली होती, तशी अशोकानेंही जंगी प्रमाणावर बौद्धमहासभा भरवून त्रिपितक नामक बौद्धधर्मग्रंथांचें संशोधन करविलें होतें. अशोक आणि अकबर दोघेही सर्व धर्माविषयीं समदृष्टी ठेवणारे होते. अकबर महंमदधर्मी होता, तरी हिंदु, ख्रिस्ती, पारसिक इत्यादि धर्मांचा आदर ठेवून त्या त्या मतांच्या लोकांचा बुद्धिवाद शांतपणें ऐकून घेत असे. अशोकानें बौद्धधर्माचा स्वीकार केला होता, तरी ब्राह्मण व जैन धर्मांचा मान तो सारखा ठेवीत असे. बौद्ध भिक्षूंप्रमाणें ब्राह्मण व श्रमण यांनाही मान व दक्षिणा देत जावी, अशी आज्ञा त्यानें आपल्या आदेशांत वारंवार केलेली आढळते. पण अकबराचे अंगीं नीतिधैर्याची उणीव ही मोठी गोम होती. महंमदी धर्मानें त्याचें समाधान होईना, ह्मणून इतर धर्मांचें ज्ञान करून घेऊन, त्या सर्वांच्या उत्कृष्ट तत्त्वांचा ज्यांत संग्रह केला आहे, असा एक नवा धर्मपंथ त्यानें काढला होता. पण हा आपला धर्मपंथ लोकांपुढें ठेवून त्यांचेकडून त्याचा अंगीकार

होईल अशी खटपट करण्यास व अशा खटपटीस महंमदी धर्माच्या लोकांकडून जो विरोध येईल, त्याला तोंड देण्यास लागणारें मानसिक धैर्य अकबराचे अंगीं नव्हतें, व ह्मणूनच भलभलत्या धर्ममतांस चिकटून राहून लोक नीतिभ्रष्ट झाले आहेत हें ठाऊक असूनही, त्यानें त्या शोचनीय स्थितीच्या प्रतीकारार्थ कांहीं एक प्रयत्न केले नाहींत. परंतु अशोकाची गोष्ट तशी नव्हती. बौद्धधर्मावर त्याची एकदां श्रद्धा बसली आणि बुद्ध, धर्म व संघ या त्रयीचा आश्रय केल्यावांचून मनुष्याला अन्य तरणोपाय नाहीं असें त्याला दिसून आल्याबरोबर, लोकापवादाची भीति बिलकुल न बाळगतां, आपण स्वतः त्या धर्माचा प्रसिद्धपणें स्वीकार केला, इतकेंच नाहीं, तर लोकांनाही त्या धर्माची महती कळावी ह्मणून जे जे उपाय त्याला करता आले, ते ते सर्व त्यानें केले. दिवाणी, मुलकी, लष्करी वगैरे खातीं ज्याप्रमाणें राज्यव्यवस्थेचीं मुख्य उपांगें असतात, त्याप्रमाणें नीत्याचरण हें एक नवें खातें अशोकानें आपल्या राज्यव्यवस्थेस जोडलें होतें. सारांश, प्रजेच्या ऐहिक व पारमार्थिक कल्याणासाठीं इतका झटणारा राजा अशोकाच्यापूर्वी व मागाहूनही या देशांत कोणी झाला नाहीं व अन्यत्रही झाल्याचें उदाहरण इतिहासांत आढळत नाहीं.

अशोकाच्या चरित्रांतल्या बारीक सारीक गोष्टी सोडून देऊन स्थूल मानानें विचार करूं लागलों ह्मणजे, इतिहासांतल्या कित्येक सिद्धांतांचें स्पष्टीकरण त्यांत झालेलें दिसतें. ‘ यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानाय धर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ’ असें भगवंतांनीं गीतेंत ह्मटलें आहे. या गीतावाक्याची सत्यता मागील काळांत अनेक वेळां लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आली आहे. पृथ्वीतलावरील ठळक ठळक धर्मांच्या इतिहासांचें मार्मिक दृष्ट्या अवलोकन केलें असतांही, हीच गोष्ट प्रत्ययास येते. लोक, धर्म आणि नीति यांविषयीं पराङ्मुख होऊन पापें करूं लागतात, तेव्हां कोणी विशेष तेजस्वी पुरुष ईश्वराच्या प्रेरणेनें निर्माण होऊन तो अधर्माचा उच्छेद करण्यासाठीं कांहीं विशिष्ट धर्ममार्ग शोधून काढतो आणि कालांतरानें धर्म व नीति यांचा अधर्मावर पगडा

बसून लोकांचे व्यवहार पुनः सुरळीत चालूं लागतात. हिंदु धर्मांतली अवताराची कल्पना व महंमद, ख्रिस्त, बुद्ध वगैरे साधूंचीं चरित्रें या गोष्टींची साक्ष देत आहेत. ही ईश्वरी योजना अजब आहे यांत संशय नाहीं. तथापि येवढ्यानें त्या योजनेचें पूर्ण स्वरूप आपणांस कळलें असें होत नाहीं. या योजनेला जोडूनच दुसरी एक योजना परमेश्वरानें करून ठेविली आहे ती फार महत्वाची आहे. महंमद, बुद्ध, किंवा ख्रिस्त यांचे सारखा धर्मसंस्थापक कांहीं एक विशिष्ट धर्ममार्ग लोकांना दाखवून देईल. आणि कांहीं कालपावेतों लोक त्या धर्माप्रमाणें चालतील; परंतु त्या धर्माला स्थिरता आणण्याला आणि लोकांमध्यें त्याचा अधिकाधिक प्रसार होण्याला कांहीं विशेष शक्तीची अपेक्षा असते. ती अपेक्षा दूर करण्यासाठीं प्रत्येक धर्मसंस्थापकाच्या मागोमाग एकेक चक्रवर्ती राजा निर्माण होईल अशी परमेश्वरानें योजना करून ठेविलेली दिसते. द्वापारयुगांत श्रीकृष्णानें उपदेशिलेल्या भागवत धर्माचा प्रसार करण्यासाठीं धर्मराज युधिष्ठिर निर्माण झाला. रोमचे लोक जेव्हां ऐषआरामांत चूर होऊन धर्मास व ईश्वरास विसरत चालले होते, तेव्हां त्यांच्या डोळ्यांत अंजन घालून त्यांना ताळ्यावर आणण्यासाठीं व ख्रिस्तीधर्माचा प्रसार करण्यासाठीं कॉनस्टंटाईन बादशहाची योजना परमेश्वरानें करून ठेविली. महंमदाचे मागें त्याचा धर्म काफर लोकांमध्यें पसरावा, ह्मणून आरब, तुर्क व मोगल बादशहा उत्पन्न होऊन, त्यांनीं त्या धर्माचा चांद एशिया व युरोप या दोन्ही खंडांत फडकाविला. त्याच रीतीनें बौद्ध धर्माच्या प्रसारार्थ अशोकाची योजना त्याच जगन्नियंत्या प्रभूकडून झाली होती. अशोकाच्या हातून ही उद्दिष्ट कामगिरी कोणत्या रीतीनें पार पडली तें वाचकांस विदित आहेच.

कोणत्याही धर्माचा देशभर प्रसार होण्यास साम्राज्य व एकभाषा या दोन गोष्टी मुख्यतः साधनीभूत असतात. साम्राज्य नसेल तर धर्माला स्थैर्य न येतां, उलट भिन्नभिन्न प्रांतांतून भिन्नभिन्न आचार व मतें निघून धर्मैक्य ह्मणून जें काय असतें तें लयास जातें. त्याचप्रमाणें एक भाषा नसेल तर कोणत्याही धर्माचा प्रसार व्हावा तितक्या झपाट्यानें

होत नाहीं. ह्मणूनच जेव्हां एखाद्या नवीन मताचा प्रसार सर्वत्र व्हावा असें ईश्वरी संकेतानें ठरतें, तेव्हां तो संकेत पार पाडण्यासाठीं साम्राज्य आणि एकभाषा यांचा योग अकल्पित रीतीनें जुळून येत असतो. अशोकाचे वेळीं असा योग जुळून आला होता. त्यानें आपल्या एकछत्री राज्याखालीं वीस कोट प्रजा आणिली होती, आणि त्या सर्वांची मुख्यत: एकच भाषा 'पाली' ही होती. आतां देशपरत्वें पाली भाषेच्या मागधी, पंजाबी, व उज्जनी अशा तीन शाखा परस्पराहून फारशा भिन्न नसल्यामुळें, पाली ही एकच भाषा त्या काळच्या भरतखंडाची होती असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

बौद्धधर्म हाच त्या काळीं हिंदुस्थानचा राष्ट्रीय धर्म होण्यास योग्य होता. अशोक जन्मला त्या काळची भरतखंडाची जी स्थिति मागें दुसऱ्या प्रकरणांत वर्णिली आहे ती पाहिली असतां असें दिसून येईल कीं जातिभेद कायम ठेवणें त्या काळीं बहुतेक अशक्य झालें होतें. ज्या शूद्रांनीं ब्राह्मणांची सेवा करावयाची ते क्षत्रियांचें स्थान पटकावूं लागल्यामुळें, ब्राह्मणांनाच उलटी शूद्रांची सेवा करण्याचा प्रसंग येऊन पडला होता. ब्राह्मणांतही ब्राह्मण्य तितपतच उरल्यामुळें त्यांचा मान कोणी ठेवीनासें झालें होतें. ब्राह्मणांचें शूद्राशीं, शूद्रांचें क्षत्रियाशीं आणि क्षत्रियांचें सर्वांशीं वैमनस्य येत होतें. अशा वेळीं सर्वांस समदृष्टीनें वागविणारा राजा निर्माण झाला नसता, तर वर सांगितलेल्या जातीजातींतल्या वैमनस्यरूपी अग्नीनें पेट घेऊन सर्वांची राखरांगोळी करण्यास कमी केलें नसतें. याच वेळीं ग्रीक लोक हिंदुस्थानाभोंवतीं घारीसारखे घिरट्या घालून आपला डाव साधण्याच्या प्रसंगाची मार्गप्रतीक्षा करीत होते. हें परस्परांतलें वैमनस्य त्यांच्या तर खासें पथ्यावर पडलें असतें. अशा वेळीं हिंदुस्थानाला तारण्यासाठींच ह्मणून जणूं काय परमेश्वरानें अशोकाला पाठवून तद्वारा हिंदुस्थानची अब्रू राखली. बौद्धधर्म कोणत्याही विशिष्ट जातीचा धर्म नव्हता, तो सार्वजनिक होता, यामुळें अशा निकराच्या वेळीं सर्वांना एक करण्यास तो फार उपयोगीं पडला. त्याचेपाशीं जातिभेद नसल्यामुळें परस्परामध्यें उच्चनीचतेचा भाव उत्पन्न

करून, वैमनस्य वाढविणें हें त्याचें ब्रीद नव्हतें. सर्व भूतांविषयीं समदृष्टि राखणें, हेंच त्याचें आदितत्व असल्यामुळें, त्या काळीं राष्ट्रीय धर्म म्हणवून घेण्यास तो सर्व प्रकारें योग्य होता, याविषयीं कोणीही शंका घेईल असें मला वाटत नाहीं,

राजाश्रय ज्याप्रमाणें धर्मवृद्धीस त्याप्रमाणें धर्महानीसही कारण होतो, हें विधान सकृद्दर्शनीं चमत्कारिक दिसतें; परंतु त्याची सत्यता बौद्ध व ख्रिस्तीधर्मांच्या इतिहासावरून चांगली प्रत्ययाला येते. कॉन्स्टंटाइन बादशहानें ख्रिस्तीधर्माचा स्वीकार केल्यामुळें त्याच्या पदरच्या पुष्कळ सरदारांना व अधिकाऱ्यांनाही त्या धर्माचा स्वीकार करण्याची बुद्धि झाली, आणि असें होतां होतां ख्रिस्ती धर्म रोमन पादशाहींत फार थोड्या काळांत उत्कर्ष पावला ही गोष्ट खरी आहे; पण त्या बरोबरच त्या धर्माला जबरदस्त अपाय करणारा प्रकार घडून आला. कॉन्स्टंटाईन यानें ख्रिस्ती धर्मगुरूंना जहागिरी, इनामें आणि वर्षासनें करून दिलीं होतीं. यामुळें त्यांची साध्वी वृत्ति व उदात्त विचार हीं हळू हळू नाहींशी होऊन, ऐषआराम आणि कुविचार यांचें प्राबल्य वाढत चाललें; ज्यांनीं दुसऱ्यांना कर्तव्योपदेश करावयाचा, ते स्वतःच कर्तव्यपराङ्मुख झाले; आपण ख्रिस्तीराष्ट्राचे मुख्य धर्मगुरू आहों, आणि ऐहिक गोष्टींतून मन काढून पारमार्थिक कल्याणासाठीं पुण्यसंचय करून ठेवण्याचा उपदेश करणें व आपल्या निष्कलंक साधुवृत्तीचें उदाहरण लोकांपुढें मांडून त्यांची तदनुरूप वृत्ति होईल असें करणें हें आपलें कर्तव्य आहे, किंबहुना यासाठींच आपला येवढा मानमरातब ठेवण्यांत येत आहे, ही मुख्य गोष्ट पोप महाराजांचे लक्षांतसुद्धां येईनाशी होऊन, आपण स्वर्गलोकचे कोणी महान् पुरुष आहों, हवें तसें स्वैरवर्तन ठेवण्याची आपणांस मुखत्यारी आहे, आणि लोकांवर जुलूम करून त्यांचेकडून गुरुदक्षिणा काढण्याचा ताम्रपट आपणांस आकाशांतल्या बापाकडून मिळाला आहे, अशाप्रकारची त्यांची विलक्षण समजूत होऊन बसली होती; मंक्स ( योगी ) आणि नन्स ( योगिनी ) यांना ब्रह्मचर्याची खरी कल्पना कळेनाशी होऊन लग्नाचा अभाव म्हणजे ब्रह्मचर्य असें

वाटूं लागलें होतें; किंबहुना लग्न झालें असतें, तर एकपती किंवा एकपत्नीव्रतानें राहण्याचा प्रसंग ओढवला असता, त्यापेक्षां आपल्या वासनातृप्तीच्या आड न येणारें हें नामधारी ब्रह्मचर्य फार चांगलें असें वाटूं लागण्याइतकी मजल येऊन पोंचली होती. सारांश, ज्या ज्या संस्था प्रथम चांगल्या स्तुत्य उद्देशानें निर्माण झाल्या, त्याच पुढें वाईट लोकांच्या हातीं गेल्यामुळें, ख्रिस्तीधर्माच्या विटंबनेस मात्र कारण झाल्या. या सगळ्या अनर्थाचें मूळ कॉन्स्टंटाईन यानें सद्बुद्धीनें दिलेल्या जाहगिरी, इनामें इत्यादि होत. असें खुद्द ख्रिस्ती ग्रंथकारही कबूल करतात. बौद्धधर्माच्या इतिहासाचें मार्मिक अवलोकन करणारांस थोड्या फार अंशानें असाच प्रकार बौद्धधर्मांतही झालेला आढळून येईल. अशोकाच्या पुरस्कर्तृत्वामुळें बौद्धधर्माचा प्रसार नुसत्या हिंदुस्थानांतच काय, पण ग्रीस, चीन, जपान, सिंहलद्वीप वगैरे दूरदूरच्या देशांतूनही झाला ही गोष्ट खरी आहे, पण त्यानें भिक्षू व भिक्षुणी यांना राहण्याच्या, खाण्यापिण्याच्या वगैरे ज्या सोयी करून दिल्या, त्यामुळें धर्माविषयींची श्रद्धा व नीत्याचरणाविषयींची आसक्ति कमी कमी होऊन, आळस व दुराचार यांचें प्राबल्य झालें व हेंच शेवटीं त्या धर्माची धूळधाण करण्यास कारण झालें, हें नाकबूल करतां यावयाचें नाहीं आणि ह्मणूनच

> "Ah! Constantine, of how much ill was cause,
> Not thy conversion, but those rich domains,
> That the first wealthy Pope received of thee."

हे डांटी कवीचे उद्गार किंचित् फेरफार करून अशोकालाही लावितां येतील.

× where in India you mean.